# माण्डुक्योपनिषद्

मण्डूक म्हणजे बेडूक. आता ह्या उपनिषदाला माण्डुक्योपनिषद् असे नाव का दिले असावे असा प्रश्न सहाजिकच आपल्या मनात येतो. कदाचित त्याचे उत्तर उपनिषद् वाचता वाचता समजावे. या उपनिषदात फक्त 12 मंत्र आहेत.

इयं कैवल्यमुक्तिस्तु केनोपायेन सिद्धयति।

माण्डूक्यमेकमेवालं मुमुक्षूणां विमुक्तये ॥ मुक्तिकोपनिषद् 26 ॥

आपल्याला मोक्ष कसा मिळेल? केवळ माण्डुक्योपनिषद् च्या अभ्यासाने मोक्षाची इच्छा करणाऱ्याला मुक्ती मिळेल.

मुक्तिकोपनिषदातील श्रीराम आणि हनुमान यांच्यामधील संवादानुसार मोक्षप्राप्तीसाठी हे एकच उपनिषद् पुरेसे आहे असे प्रभू श्रीरामांनी म्हटलेले आहे. मुक्तिकोपनिषदातील ११ मुख्य उपनिषदांमध्ये मांडूक्य उपनिषदाचा पहिला क्रमांक आहे.

आदि शंकराचार्य यांचे गुरु श्री गोविन्द नाथ. आचार्य गोविन्द नाथ यांचे गुरु आचार्य गौंडपाद नाथ. आचार्य गौंडपाद नाथ यांनी माण्डुक्योपनिषदावर कारिका लिहिली आहे. आदि शंकराचार्यांचे ह्या कारिकेवरील भाष्य सर्वांना माहित आहे.

श्री गौडपादाचार्य आणि श्री आदी शंकराचार्य यांची गुरुशिष्यपरंपरा विशद करणारा एक श्लोक आहे. तो खालीलप्रमाणे :

ॐ नारायणं पद्मभवं वसिष्ठं शक्तिं च तत्पुत्रपराशरं च ।

व्यासं शुकं गौडपदं महान्तं गोविन्द योगिन्द्रमथास्य शिष्यम् ॥

श्रीशंकराचार्यमथास्य पद्मपादं च हस्तामलकं च शिष्यम् । तं तोटकं वार्तिककारमन्यानस्मद्गुरून् सन्ततमानतोऽस्मि ॥

हे उपनिषद् ओम् (ॐ) या अक्षराची चर्चा करते.

जेव्हा ब्रह्मदेवांना श्रीविष्णूंनी सृष्टी ची रचना करण्यास सांगितले तेव्हा ब्रह्म देवांच्या मनात चलबिचल होऊ लागली. त्यावर श्रीविष्णूंनी त्यांना ॐ चा जप करण्यास सांगितले. सृष्टीतील विविध घटकांचा वापर करून त्यांनी मानवनिर्मिती केली त्यावेळी मुखातून अखंड ॐ चा जप चालूच होता. त्यामुळे निर्माण झालेल्या प्रत्येक गोष्टीत ॐ चा अंश उतरला.

ॐ काराला काळाच्या मर्यादा नाहीत. त्याला त्रिकालातीत असे संबोधले जाते.

अ उ आणि म अशा तीन अक्षरांपासून तयार झालेला ॐ, जीभेच्या वापराशिवाय उच्चारता येतो. मुक्या माणसाला सुद्धा त्याचा उच्चार करणे शक्य आहे.

ॐ चा अध्यात्मिक अर्थ ह्या उपनिषदामुळे आपल्याला समजेलच.

या उपनिषदात जरी 12 च मंत्र असले तरी

श्री गौड़पादांनी माण्डुक्योपनिषदावर एकूण 215 कारिका लिहिताना 4 प्रकरणे लिहिली आहेत.

1. आगम प्रकरण - 29 (वैदिक साक्ष्य वर आधारित अध्याय)

2. वैतथ्य प्रकरण-38 (भ्रमावर आधारित अध्याय)

3. अद्वैत प्रकरण-48

4. अलातशांति प्रकरण-100

ह्या उपनिषदाचा अभ्यास करताना ह्या प्रकरणांचा अभ्यास अनिवार्य आहे.

आगम गम् धातु म्हणजे जाणे. आ+गम् म्हणजे येणे. जे ऋषींच्या मुखातून बाहेर पडले आहे ते.

वैतथ्य म्हणजे विपरीत तत्थ्य, मिथ्यात्व

अद्वैत चा सहज समजणारा अर्थ म्हणजे ब्रह्म.

अलातशांति म्हणजे ज्ञानप्राप्ती झाल्यावर मिथ्या गोष्टींचे निराकरण.

भिंगोरी निधिये पडली । ते गमे भूमीसी जैसी जडली ।

तैसी वेगातिशयो भुली । होतु जाय ॥ किंवा

आंधारे भोवडितां कोलती । ते दिसे जैसी आयती । चक्राकार ॥ ज्ञानेश्वरी 15.136।।

ह्या उपनिषदाचा शांतिमंत्र

खालीलप्रमाणे

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।

स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः।।

---

**ओमित्येतदक्षरमिदं सर्वं तस्योपव्याख्यानं भूतं भवद् भविष्यदिति सर्वमोङ्कार एव। यच्चान्यत् त्रिकालातीतं तदप्योङ्कार एव ॥1 ॥**

ॐ इति एतत् अक्षरम् इदं सर्वं तस्य उपव्याख्यानं भूतं भवत् भविष्यत् इति सर्वम् ओङ्कारः एव। यत् अन्यत् च त्रिकालातीतं तत् अपि ओङ्कारः एव ॥

ॐ

इदम् हे इदम् नपु. प्र. ए. व.

सर्वं सर्व नपु. प्र. ए. व.

इति असे अव्यय

एतत् हे एतद् नपु. प्र. ए. व.

अक्षरम् अक्षर नपु. प्र. ए. व.

तस्य त्याचे तद् नपु. ष. ए. व.

उपव्याख्यानम् स्पष्टीकरण उप+व्याख्यान नपु. प्र. ए. व.

भूतम् घडलेले भूत नपु. प्र. ए. व.

भवत् भू धातु होणे + शतृँ प्रत्यय भ्वादिः नपु. प्र. ए. व.

भविष्यत् घडणारे भविष्यत् नपु. प्र. ए. व.

इति असे अव्यय

सर्वम् सर्व नपु. प्र. ए. व.

ओङ्कारः ॐ

एव नक्की अव्यय

अन्यत् इतर अन्य नपु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

यत् जे यत् नपु. प्र. ए. व.

त्रिकालातीतं तीनही काळात त्रिकाल+अतीत नपु. प्र. ए. व.

तत् ते तत् नपु. प्र. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

ओङ्कारः ॐ

एव नक्कीच अव्यय

ॐ ह्या अक्षरापासून बहुतेक सर्व मंत्रांची सुरवात होते तशीच ती येथे सुद्धा झाली आहे. पण त्यापलीकडे जाऊन ॐ ची व्याप्ती ह्या मंत्रात सांगितली आहे. सृष्टीच्या निर्मितीच्या सुरवातीला ॐ असा कंपित ध्वनी निर्माण झाला असावा असे म्हणतात. ज्ञानेश्वरांना ॐकारात 3 अक्षरे दिसली अ उ म. अकार उकार आणि मकार या तीन अक्षरांनी तयार झालेला हा ॐ. तीन ध्वनी पासून तयार झालेले एकमेव अक्षर. क्षर न होणारे म्हणजे न झिजणारे ते अक्षर. हे त्याचे नाव आणि वैशिष्ट्यपूर्ण रूप सुद्धा आहे. ॐ राचे विविध अर्थ सांगितले जातात.

अ म्हणजे अंधकार, अज्ञान, उ  म्हणजे रजोगुण गतिशीलता,

म म्हणजे सत्व, शुद्धता, प्रकाश.

अ = ब्रह्मा (निर्माता), उ = विष्णु (परिरक्षक), म = शिव (विध्वंसक)

अ = वर्तमान, उ = भूत, म = भविष्य

अ = जागृत अवस्था ,

उ = स्वप्नावस्था

म = गाढ निद्रा

पतंजली ऋषींनी ओंकारासाठी प्रणव हा शब्द योजिला आहे. प्रणव म्हणजे भगवन्तासाठी उच्चारलेला स्तुतिपर शब्द.

श्रीमद्भगवद्गीतेच्या 8 व्या अध्यायाचे अक्षरब्रह्म योग असे नाव आहे.

खूप मोठे विधान ह्या मंत्रात केले आहे ते शास्त्रीय दृष्ट्या समजावून सांगणे कठीण आहे. परन्तु निराकार निर्गुण परमेश्वराचे हे ध्वनीस्वरूप आहे असा अर्थ घेतला तर ह्या मंत्राचा अर्थ पटू शकतो.

ध्वनी च्या निर्माण प्रक्रियेचा विचार करता अकार आपल्या स्वरयंत्रापासून तर मकार औष्ठ्य म्हणजे ओठांचा वापर करून उच्चारला जातो म्हणजे आपली संपूर्ण ध्वनी निर्मिती ची यंत्रणा ॐ ने व्यापून टाकली आहे. परमात्म्याचे सर्वव्यापी स्वरूप असे प्रतीत होते.

ब्रह्माचे वर्णन निरनिराळ्या श्रुतींमधे खालील प्रमाणे केले आहे.

न भूमिरापो न च वह्निरस्ति न चानिलो मेऽस्ति न चाम्बरं च ॥ कैवल्योपनिषद् 23॥

ना पृथ्वी ना पाणी ना अग्नी ना वायू ना आकाश.

पंचमहाभूतांना प्रकृति असे म्हणतात.

अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं

तथाऽरसं नित्यमगन्धवच्च यत् । अनाद्यनन्तं महतः परं ध्रुवम् निचाय्य तन्मृत्युमुखात् प्रमुच्यते ॥ कठोपनिषद् 1.3.15॥

जो अशब्द, अस्पर्श, अरूप, अक्षय तसेच रसहीन नित्य आणि गन्धरहीत, अनादी, महत् तत्त्वाच्या पलिकडचा निश्चल आहे त्याला जाणून पुरुष मृत्यू च्या जबड्यातून मुक्त होतो.

यत्तदद्रेश्यमग्राह्यमगोत्रमवर्णमचक्षुःश्रोत्रं तदपाणिपादम् ।

नित्यं विभुं सर्वगतं सुसूक्ष्मं तदव्ययं यद्भूतयोनिं परिपश्यन्ति धीराः ॥मुण्डकोपनिषद् 1.1.6॥

जे अदृश्य अग्राहय अगोत्र अवर्ण आहे, ज्याला डोळे कान हात पाय नाहीत ते नित्य आहे सर्व रूपांत व्यक्त होणारे आहे. सर्वव्यापी आहे आणि सूक्ष्माहून सूक्ष्म आहे. असे ते अविनाशी तत्त्व संपूर्ण निर्मितीचे मूळ उगमस्थान आहे हे विवेकी पुरुष जाणतात.

न तत्र चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति नो मनो

न विद्मो न विजानीमो यथैतदनुशिष्यात्।

अन्यदेव तद्विदितादथो अविदितादधि।

इति शुश्रुम पूर्वेषां ये नस्तद्व्याचचक्षिरे ॥केनोपनिषद् 1.3।।

जेथे दृष्टी जात नाही न वाचा न मन. आपण ते जाणू शकत नाही, दुसऱ्याला शिकवू शकत नाही. जे माहित आहे त्यापेक्षा निराळे आणि जे माहित नाही त्यापेक्षाही निराळे. ज्यांनी ते आम्हाला सांगितले, ते त्यांच्या गुरूंनी ऐकले होते.

अशा ह्या परमात्म्याचा एकमेव हुंकार म्हणजे ॐ.

ज्याचा उच्चार मुक्या व्यक्तीला सुद्धा करता येतो जे शास्त्रीय सत्य आहे.

परमात्म्याची वैशिष्ट्ये ॐकारात भरून राहिली आहेत.

येथे वापरलेले इदम् हे सर्वनाम आपली ओंकाराशी असणारी जवळीक दर्शवतो.

ह्या मंत्रात ॐ त्रिकालातीत आहे असे म्हटले आहे म्हणजे काळ, स्थळ आणि कारण ह्यांच्या सुद्धा पलिकडे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

ॐ हे एक अक्षर आहे. त्याचे विवेचन या ठिकाणी करण्यात आले आहे. भूत, वर्तमान आणि भविष्य काळी, जे होऊन गेले, आता आहे आणि पुढेही असेल ते सर्व ॐ कारच होय. याशिवाय दुसरे त्रिकालातीत असणारे देखील ॐ कारच आहे.

---

**सर्वं ह्येतद् ब्रह्म अयमात्मा ब्रह्म सोऽयमात्मा चतुष्पाद् ॥2॥**

एतत् सर्वं हि ब्रह्म। सः अयम् आत्मा चतुष्पात् ॥

एतत् हा एतद् नपु. प्र. ए. व.

सर्वं सर्व नपु. प्र. ए. व.

हि

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपु. प्र. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

चतुष्पात् चतुष्पाद् नपु. प्र. ए. व.

आधीच्या मंत्रात आपण ओंकाराची व्याप्ती समजून घेतली. आता आणखी विस्ताराने आपल्याला ॐ समजून घ्यायचा आहे. ह्या मंत्रातील चतुष्पाद् ह्या शब्दाचा अर्थ समजून घ्यायला हवा. आपल्याला ॐ मध्ये समाविष्ट असलेले चार भाग माहीत आहेत. यामध्ये अ, उ, म् आणि अनुस्वार यांचा समावेश होतो. त्या विशिष्ट आकारामागे काही विशिष्ट संकल्पना आहेत. यांनाही पाद अशीच संज्ञा आहे. ॐ काराचे सूक्ष्म आणि स्थूल स्वरूप समजावे म्हणूनच केवळ हे चार पाद मानण्यात आले असावेत. या सर्वांची ओळख पुढील मंत्रापासून करून देण्यात आली आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

हे सर्व ब्रह्म आहे. हा आत्माही ब्रह्मच आहे. या आत्म्याचे चार भाग आहेत.

---

**जागरितस्थानो बहिष्प्रज्ञः सप्ताङ्ग एकोनविंशतिमुखः स्थूलभुग् वैश्वानरः प्रथमः पादः ॥ 3 ॥**

जागरितस्थानः बहिः प्रज्ञः सप्ताङ्गः एकोनविंशतिमुखः स्थूलभुक् वैश्वानरः प्रथमः पादः ॥

जागरितस्थानः जागृत अवस्था हे कार्य जागरितस्थान पु. प्र. ए. व.

बहिष्प्रज्ञः बाह्य जगाचे ज्ञान असणारा बहिष्प्रज्ञ पु. प्र. ए. व.

सप्ताङ्गः सात अंगे असणारा सप्ताङ्ग पु. प्र. ए. व.

एकोनविंशतिमुखः एकोणीस मुखे असणारा एकोनविंशतिमुख पु. प्र. ए. व.

स्थूलभुक् भौतिक सुख उपभोगणारा स्थूलभुज् नपु. प्र. ए. व.

वैश्वानरः वैश्वानर पु. प्र. ए. व.

प्रथमः प्रथम पु. प्र. ए. व.

पादः भाग पाद पु. प्र. ए. व.

आधीच्या मंत्रात आपण आत्म्याचे चार विभाग आहेत असे वाचले, ते अर्थातच एकमेकांपासून वेगळे नाहीत तर एकात एक गुंफलेले आहे. त्यांचे अंतरंग एकच मात्र बाह्यरूपे निराळी आहेत आपापल्या कार्यानुसार. जिवंत माणसाच्या, प्रामुख्याने तीन अवस्था दिसून येतात. जाग्रत अवस्था, स्वप्नावस्था आणि सुषुप्ति म्हणजे गाढ झोप.

ह्या मंत्रात जागृत अवस्थेचे वर्णन केले आहे, त्याला प्रथम पाद म्हणजे वैश्वानर असे म्हटले आहे. जागृत अवस्था म्हणजे आपली सामान्य अवस्था ज्यामधे आपण आपली दैनंदिन कर्म करत असतो जसे चालणे बोलणे खाणे पिणे वगैरे. त्याच बरोबर आपण बाह्य जगाचे ज्ञान घेत असतो. असे ज्ञान घेत असतानाच आपले मन माया शक्ती च्या प्रभावाखाली येत असते.

वैश्वानर हा संपूर्ण विश्वातील अग्नी किंवा ऊर्जा आहे, जो प्रत्येक जीवामध्ये असतो. त्याचे अनेक ठिकाणी उल्लेख वाचायला मिळतात.

वैश्वानरः प्रविष्यतिथिर्ब्राह्मणो गृहान्।।

तस्यैतां शांतिं कुर्वन्ति हर वैवस्वतोदकम् ॥ कठोपनिषद् 1.1.7।।

ब्राह्मण अतिथि होऊन अग्नी सारखा घरात प्रवेश करत असतो. साधूपुरूष त्या अतिथीची शांती करतो. हे वैवस्वता! शांती करण्यासाठी पाणी घेऊन ये.

जे पवित्रपणें वैश्वानर, जे स्फूर्तिकिरणाचे दिनकर ज्ञातेपणें दृष्टीसमोरे, ब्रह्मांड न ये ||दासबोध दशक पहिला : स्तवननाम ||1||  समास सहावा : श्रोतेजनस्तवन 7||

ते अग्नीसारखे पवित्र असतात तर स्फूर्तिरुपी किरणांचे सूर्यच वाटतात. ज्याप्रमाणें सूर्यापासून प्रकाशकिरणें अखंड बाहेर पडतात त्याचप्रमाणें त्यांची स्फूर्ति सदैव जागी असते. त्यांचे ज्ञान इतकें अमर्याद असतें कीं त्यांच्या दृष्टीनें आपलें हें विश्व अगदीच क्षुल्लक समजलें जातें.

अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम्।।श्रीमद्भगवद्गीता । 15.14।।

सजीवांच्या शरीरात राहणारा मी प्राण अपान यांनी युक्त असा वैश्वानर चार प्रकारचे अन्न पचवतो.

तटिल्लेखातन्वीं तपनशशिवैश्वानरमयीं

निषण्णां षण्णामप्युपरि कमलानां तव कलाम् महापद्माटव्यां मृदितमलमायेन मनसा

महान्तः पश्यन्तो दधति परमाह्लादलहरीम्॥ सौंदर्यलहरी 21।।

देवीला उद्देशून लिहिलेल्या श्लोकात वीजेसारखी चमकणारी, तपस्येमुळे तेजोमय, चंद्रासारखी शीतल, अग्नीप्रमाणे तेजस्वी सहा कमळाच्या पाकळ्यांवर विराजमान अशी अद्भुत सौंदर्यवती आहे.

छांदोग्य उपनिषदातील 5 व्या अध्यायातील 13 व्या खंडात वैश्वानर ला विश्वरूप असे संबोधले आहे आणि त्याची पूजा केली असता त्यापासून होणाऱ्या लाभांचे वर्णन केले आहे.

शब्दकोशात वैश्वानर शब्दाचे तीन अर्थ सांगितले आहेत. 1. जो सर्वांमधे आहे. 2. जो सर्वांचे नेतृत्व करतो आणि 3. सर्वांचा मित्र. थोडक्यात तो सार्वभौमिक आहे.

अशा ह्या वैश्वानराला सात अंगे आहेत, अर्थातच त्यायोगे बाह्य जगताचे ज्ञान होणार आहे.

आकाश म्हणजे वैश्वानराचे मस्तक, सूर्य वैश्वानराचे डोळे, वायु म्हणजे वैश्वानराचा श्वास, अग्नि वैश्वानराचे हृदय, जल वैश्वानराचे पोट, पृथ्वी वैश्वानराचे पाय, अंतरिक्ष हे वैश्वानराचे शरीर असे म्हटले आहे.

अशा ह्या वैश्वानराला एकोणीस मुखे आहेत.

त्यांची नावे पुढिल प्रमाणे

5 ज्ञानेन्द्रिये नाक कान डोळे जीभ आणि त्वचा

5 कर्मेन्द्रिये हात, पाय, गुदद्वार, जननेंद्रिय आणि तोंड.

पंचप्राण प्राण, अपान, समान, व्यान आणि उदान

मन, बुद्धी चित्त आणि अहंकार. ह्या एकोणीस मुखांच्या साहयाने आपण आत्म्याचा बाहेरील जगाशी संबंध प्रस्थापित करतो..

जागृत अवस्थेत आपल्या देहात कार्य करणारा हा आत्मा सृष्टीचा उपभोग घेत आहे आणि ज्ञान प्राप्त करत आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

जागृत अवस्था हे ज्याचे कार्य क्षेत्र, जो बाहय जगताचे ज्ञान प्राप्त करून घेतो, ज्याला सात अंगे आणि एकोणीस मुखे आहेत असा स्थूल (भौतिक) जगाचा उपभोग घेणारा, आत्म्याचा प्रथम भाग म्हणजे वैश्वानर.

---

**स्वप्नस्थानोऽन्तःप्रज्ञः सप्ताङ्ग एकोनविंशतिमुखः प्रविविक्तभुक्तैजसो द्‌वितीयः पादः ॥4 ॥**

स्वप्नस्थानः अन्तःप्रज्ञः सप्ताङ्गः एकोनविंशतिमुखः प्रविविक्तभुक् तैजसः द्‌वितीयः पादः ॥

स्वप्नस्थानः स्वप्नावस्था हे कार्यक्षेत्र स्वप्नस्थान पु. प्र. ए. व.

अन्तप्रज्ञः आंतरिक विषयांची जाण असणारा अन्तष्प्रज्ञ पु. प्र. ए. व.

सप्ताङ्गः सात अंगे सप्ताङ्ग पु. प्र. ए. व.

एकोनविंशतिमुखः एकोणीस मुखे एकोनविंशतिमुख पु. प्र. ए. व.

प्रविविक्तभुक् विषय स्पर्श रहित सूक्ष्म विषय भोगणारा प्रविविक्तभुज् नपु. प्र. ए. व.

प्र+वि+विच धातु अलग करणे +क्तः प्रत्यय

तैजसः तेजस्वी तैजस पु. प्र. ए. व.

द्वितीयः दुसरा द्वितीय पु. प्र. ए. व.

पादः भाग पाद पु. प्र. ए. व.

आत्म्याच्या चार पदांपैकी दुसऱ्या पदाचे विवेचन आपण ह्या मंत्रात वाचणार आहोत, त्याला तैजस असे म्हटले आहे. पहिला पाद म्हणजे वैश्वानर जो स्थूल विषयांचा उपभोक्ता आहे. दुसऱ्या पादात आपल्या स्वप्नावस्थेचे वर्णन केले आहे. त्यासाठी माणसाला आधी झोप आली पाहिजे.

तत्सर्वं परे देवे मनस्येकीभवति । स्वपितीत्याचक्षते ॥ प्रश्नोपनिषद् 4.2।।

प्रश्नोपनिषदात निद्रेचे अतिशय समर्पक वर्णन केले आहे. जेव्हा (जागृत अवस्थेत  अनेक कर्मे करणारी इन्द्रिये) सर्व इन्द्रिये एका मनोरूपी देवाच्या ठिकाणी एकरूप होतात तेव्हा तो झोपी गेला आहे असे म्हणतात.

मनी वसे ते स्वप्नी दिसे असे म्हणतात पण कधीकधी जगात, अस्तित्वात नसणाऱ्या किंवा अशक्य अशा गोष्टी सुद्धा आपल्याला स्वप्नात दिसतात. जागृत अवस्था आणि स्वप्न यामध्ये फरक कसा करावा? जागृत अवस्थेत आपण आपल्या मर्जीने कार्य करतो, ज्ञान ग्रहण करतो. स्वप्न पडणे हे आपल्या हातात नाही. स्वप्नात घडणाऱ्या घटना खर्या नसतात पण एखादे भीतीदायक स्वप्न बघितल्यानंतर फुटणारा घाम, हृदयाची धडधड खरी असते. त्याच्या उलट अतिशय आनंददायी अशी स्वप्ने सुद्धा आपण बघतो ज्यामुळे आपल्याला जाग आल्यावर सुद्धा प्रसन्नता मिळते. आपण स्वप्नात खातो पितो, इतरांशी बोलतो स्वप्नात आपण पूर्ण जग फिरून येऊ जे प्रत्यक्षात कधीच घडलेले नसेल. आपण ज्यांना स्वप्नात पाहतो, त्यांनी आपल्याला त्यांच्या स्वप्नात पाहिले, असेही होत नाही. आपण आपले डोळे बंद ठेवूनच स्वप्न बघतो. म्हणजे तसे बघायला गेले तर ज्ञानेन्द्रिये आणि कर्मेन्द्रिये यांच्या मदतीशिवाय. फक्त आपले मन आणि बुद्धी हेच स्वप्न पाहण्यास पुरेशी आहे. आपल्या मनाचे कार्य चालू असते, यामुळेच सात अंगे

आणि एकोणीस मुखांचा उल्लेख करून त्यांचे सूक्ष्म रूप कार्यरत असते असे येथे सूचित केले आहे. ह्या सर्वांच्या मागे आहे आपली चैतन्यशक्ती म्हणजे आत्मा. ज्याच्या कडे तेज आहे तो तैजस. खरेतर अंतरंगातील ज्ञान प्राप्त करण्यासाठी कोणत्याही प्रकाशाची आवश्यकता नाही. म्हणजेच ज्ञानरूपी तेजाचा उल्लेख येथे केला आहे. स्वप्नांच्या आधारे आपल्या मानसिक स्थितीचा अंदाज बांधणे शक्य आहे. स्वप्नात पाहिलेल्या कोणत्याही गोष्टी त्या क्षणी प्रत्यक्ष घडत नसतात. काहींना भविष्यात घडणाऱ्या गोष्टींची चाहूल स्वप्नात लागते असे म्हणतात.

थोडक्यात सूक्ष्माचे अवलंबन करणारा, सूक्ष्माचा उपभोग घेणारा असा हा तैजस द्‌वितीय पाद आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

स्वप्न हे कार्यस्थान असणारा, अंतःस्थिती पाहणारा सात अंगे आणि एकोणीस मुखांनी विषयांचा उपभोग घेणारा तैजस हा द्‌वितीय पाद आहे.

---

**यत्र सुप्तो न कञ्चन कामं कामयते न कञ्चन स्वप्नं पश्यति तत् सुषुप्तम्।**

**सुषुप्तस्थान एकीभूतः प्रज्ञानघन एवानन्दमयो ह्यानन्दभुक् चेतोमुखः प्राज्ञस्तृतीयः पादः ॥5 ॥**

यत्र सुप्तः कञ्चन कामम् न कामयते। कञ्चन स्वप्नम् न पश्यति। तत् सुषुप्तम् सुषुप्तस्थानः एकीभूतः प्रज्ञानघनः एव आनन्दमयः हि आनन्दभुक् चेतोमुखः प्राज्ञः तृतीयः पादः ॥

यत्र जेथे अव्यय

सुप्तः गाढ निद्रा सुप्त पु. प्र. ए. व.

स्वप्+क्तः प्रत्यय

कञ्चन कोणतीही कम्+चन  पु. द्‌वि. ए. व.

कम् किम् सर्वनाम पु. द्‌वि. ए. व.

सर्व. पुं. द्‌वि. ए. व.

कामम् कामना काम पु. द्‌वि . ए. व.

न अव्यय

कामयते इच्छा करतो काम् धातु कर्तरि लट् लकारः आत्मने पदम् प्र पु. ए. व.

कञ्चन कोणतेही कम्+चन  पु. द्वि. ए. व.

स्वप्नम् स्वप्न नपु. प्र. ए. व.

न अव्यय

पश्यति पाहतो दृश् धातु कर्तरि लट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

सुषुप्तम् सुषुप्ती सुषुप्त पु. द्वि. ए. व.

सुषुप्तस्थानः सुषुप्ती हे कार्य/अवस्था

सुषुप्तम् स्थानम् यस्य सः

सुषुप्तस्थान पु. प्र. ए. व.

एकीभूतः एकवटलेला एकीभूत पु. प्र. ए. व.

प्रज्ञानघनः केवळ प्रज्ञा प्रज्ञानघन पु. प्र. ए. व.

एव नक्की अव्यय

आनन्दमयः आनन्दमय पु. प्र. ए. व.

हि अव्यय

आनन्दभुक् आनंद उपभोगणारा आनन्दभुज् नपु. प्र. ए. व.

चेतोमुखः चेतनाशक्तीचे द्वार चेतोमुख पु. प्र. ए. व.

प्राज्ञः प्राज्ञ पु. प्र. ए. व.

तृतीयः तृतीय पु. प्र. ए. व.

पादः पाद पु. प्र. ए. व.

मराठी झोपणे, झोपवणे ह्या शब्दावर अनेक शाब्दिक कोट्या निरनिराळ्या अर्थाने प्रचलित आहेत. येथे मात्र सुषुप्ती म्हणजे गाढ झोप एवढाच अर्थ आहे.

आधीच्या दोन मंत्रांमधे बहिःप्रज्ञः आणि अंतःप्रज्ञा अशा दोन स्थानांना अनुक्रमे वैश्वानर आणि तैजस अशा संज्ञा सांगून झाल्यावर ते दोन्हीही नाही अशी अवस्था म्हणजे सुषुप्ती. साधारण सुरवातीचे काही तास आपली झोप गाढ अशी असते नंतर ती सावध होत जाते. गाढ झोपेत आपल्या मेंदू चे कार्य हृदय आणि श्वसन अतिशय कमी गतीने चालू असते म्हणजे एक प्रकारे शरीराला विश्रांती मिळत असते. जे काही शरीराचे कार्य ह्या अवस्थेत चालू असते त्यावर आपल्या इच्छेचा काहीच प्रभाव नसतो. अती झोप आणि गाढ झोप ह्यामधील नेमका फरक समजून घ्यायला हवा. अती झोप आणि आळशीपणा हे तामसी वृत्तीचे लक्षण आहे.

जाग्रतस्वप्नसुषुप्तभेदे तुर्याभोग संवित।ज्ञानं जाग्रत। स्वप्नोविकल्पाः।

अविवेको मायासौषुप्तम्।

त्रितयभोक्ता वीरेशः।

शिवसूत्र 2।।

जाग्रत, स्वप्न और सुषुप्ति ह्या तीन अवस्थांना पूर्णपणे जाणून घेतल्यास तुर्यावस्था चे सुद्धा ज्ञान होते.

ज्ञान म्हणजेच जाग्रत अवस्था तर विकल्प म्हणजे स्वप्नावस्था. अविवेक अर्थात स्व-बोधाचा अभाव हा मायामय असून ती सुषुप्ती अवस्था आहे. ह्या तीनही गोष्टींच्या भोक्त्याला वीरेश म्हणतात.

स्वप्नात पाहिलेल्या गोष्टी खऱ्या हे फक्त स्वप्नावस्थेतच म्हणता येते. मग जागृत अवस्थेचे काय? तेव्हा दिसणारे जग हे सुद्धा मिथ्याच. जागृत नाही, स्वप्न सुद्धा नाही ती अवस्था म्हणजे सुषुप्ती. निद्रिस्त माणूस त्या काळापुरता इच्छाआकांक्षा कामनांपासून दूर असतो. एवढेच नव्हे तर त्याचा बाह्य जगाशी सुद्धा काहीच संबंध नसतो. ह्याला आत्मसंतुष्ट असे म्हणता येईल. म्हणूनच ह्या मंत्रात आत्म्याचे आनंदमय आणि केवळ आनंदाचा उपभोग घेणारा आनंदभुक असे वर्णन केले आहे. योगसूत्रातील समाधी अवस्था आणि सुषुप्ति ह्यामधे फक्त

झोपेचा फरक. परमात्म्याशी एकरूप होणाऱ्या ह्या दोन्ही अवस्था, कारण ह्या मंत्रात एकीभूत असा शब्द वापरला आहे.

सुषुप्तस्य स्वप्नादर्शने क्लेशाभावादपवर्गः ॥ न्यायदर्शनम् 4.1.63॥

जसे सुषुप्त अवस्थेत मनुष्याला स्वप्न सुद्धा पडत नसल्याने भावनिक क्लेश होत नाहीत तसेच मोक्ष अवस्थेत घडते.

आत्म्याच्या ह्या तिसऱ्या भागाला प्राज्ञ असे म्हटले आहे. प्रज्ञानघन म्हणजे केवळ ज्ञान. ज्ञानाशिवाय दुसरे काहीही नाही.अशा ह्या आत्म्याच्या तिसऱ्या पादाला चेतोमुख असे म्हटले आहे. चित्त हेच ते मुख. आधीच्या दोन्ही पादांना एकोणीस मुखे आणि सात अंगे होती. आधीच्या मंत्रात बहिप्रज्ञ आणि अंतःप्रज्ञ असे आत्म्याचे वर्णन केले होते. जागृत आणि स्वप्न अवस्थेत मनाचा सहभाग असतो. गाढ निद्रा अवस्थेत कोणतीच ज्ञानेन्द्रिये आणि कर्मेन्द्रिये सक्रिय नाहीत. कार्यरत आहे ती फक्त चेतनाशक्ती. शिवसूत्र आणि शंकरभाष्यामधे सुषुप्ती अवस्थेला अज्ञान असे म्हटले आहे कारण रूप शब्द रस गंध आणि स्पर्श ह्या सर्वांचा अभाव या अवस्थेत दिसून येतो. स्वामी चिन्मयानंद यांनी चेतोमुख चा अर्थ स्वप्नावस्था आणि जागृत अवस्था यामध्ये प्रवेश करण्यासाठीचे द्वार असे म्हटले आहे. ह्याचा अर्थ कसा समजून घ्यायचा? त्यासाठी नवजात शिशु मी डोळ्यासमोर आणते. रूढार्थाने त्याने अजून बाह्यजगाचे ज्ञान प्राप्त केलेले नाही. पंचभूतांच्या गुणांपैकी जेमतेम स्पर्शाचे त्याला आकलन आहे. आणि हळूहळू तो आपल्या ज्ञानेन्द्रियांद्वारे ज्ञान प्राप्त करून घेणार आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

गाढ झोपी गेलेला कोणतीही इच्छा बाळगत नाही, कोणतेही स्वप्न पाहत नाही. सुषुप्ती हे ज्याचे कार्यस्थल, असा आत्मा एकजिनसी, आनंदमयी, आनंद उपभोगणारा असा तिसरा पाद, प्राज्ञ होय.

---

**एष सर्वेश्वरः एष सर्वज्ञ एषोऽन्तर्याम्येष योनिः सर्वस्य प्रभवाप्ययौ हि भूतानाम् ॥6 ॥**

एषः सर्वेश्वरः। एषः सर्वज्ञः। एषः अन्तर्यामी। एषः सर्वस्य योनिः। हि भूतानां प्रभवाप्ययौ ॥

एषः हा एतद् पु. प्र. ए व.

सर्वेश्वरः सर्वांचा ईश्वर सर्वेश्वर पु. प्र. ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए व.

सर्वज्ञः सर्व जाणणारा सर्वज्ञ पु. प्र. ए. व.

एषः हा एतद् पु. प्र. ए व.

अन्तर्यामी आतून नियमन करणारा अन्तर्यामिन् पु. प्र. ए. व.

अन्तः+यामि

एषः हा एतद् पु. प्र. ए व.

सर्वस्य सर्व पु. ष. ए. व.

योनिः उगमस्थान योनि स्त्री. प्र. ए. व.

हि अव्यय

भूतानाम् सजीवांचे भूत नपु. ष. ब. व.

प्रभवाप्ययौ उत्पत्ती आणि लयस्थान प्रभवः+ अपिअयः

प्र+भू धातु होणे + अय् धातु जाणे

सर्वात पहिल्या मंत्रात ॐकाराचे विवेचन आपण वाचले. ॐकार त्रिकालातीत असे शाश्वत आहे असे आपण वाचले. त्यापुढील मंत्रात आपण ब्रह्म म्हणजेच आत्मा आणि त्याचे चार पाद आहेत असे वाचले. त्यापैकी आपण तीन पादांची माहिती करून घेतली. आता ह्या मंत्रात हा आत्मा सर्वांचा ईश्वर असे म्हटले आहे. म्हणजे फक्त 5व्या मंत्रातील प्राज्ञ कि वैश्वानर आणि तैजस सुद्धा हे अजून स्पष्ट झालेले नाही. आपण हे संपूर्ण आत्म्याबद्दल म्हटले आहे असे मानू. सर्वेश्वर म्हणजे सर्वांचा ईश्वर. त्याच्या इच्छेला मान दिलाच पाहिजे असे एका सुभाषितात खुद्द महादेवांना उद्देशून म्हटले आहे.

स्वयं महेश: श्वसुरो नगेश:, सखा धनेशस्तनयो गणेश : ।तथापि भिक्षाटनमेव शम्भो:,बलीयसी केवलमीश्वरेच्छा ॥

स्वतः भगवान शंकर, त्यांचे ससुर हिमालय आहेत, ज्यांचे मित्र कुबेर, पुत्र गणेश आहेत, तरीसुद्धा, शंभूने भिक्षाटन केले आहे, कारण ईश्वराची इच्छा (ईश्वरेच्छा) अधिक शक्तिशाली आहे. आधीच्या मंत्रात आत्म्याचा तिसरा भाग म्हणजे प्राज्ञ ह्याला चेतोमुख असे म्हटले होते. चेतोमुख म्हणजे स्वप्नावस्था आणि जागृत अवस्था यामधे प्रवेश करण्याचे द्वार असा अर्थ आपण वाचला होता.

जागृत अवस्थेत मायाशक्ती चा प्रभाव, स्वप्नावस्थेत आपण स्वतःच निर्माण केलेले मायाशक्तीच्या प्रभावाखालचे जग आहे आणि सुषुप्ती अवस्थेत मात्र सर्व काही स्थिर आहे. ह्याचाच दुसरा अर्थ नित्य प्रलय याच्याशी जोडला गेला आहे. श्रीमद्भगवद्गीतेच्या 8 व्या अध्यायातील 18,19 व्या श्लोकात नित्य प्रलयांचे विवेचन केले आहे. विष्णु पुराणात चार प्रकारच्या प्रलयांचे वर्णन केले आहे, त्यापैकी नित्य प्रलय म्हणजे सजीवांचा सरसकट होणारा मृत्यू आणि मृत शरीराचे पंचमहाभूतांमधे होणारे विलीनीकरण. हे एक प्रकारचे परीवर्तन सुद्धा आहे. जसे पाने फुले गवत वाळून जातात आणि नव्याने तयार होतात. जलाशयातील पाण्याची वाफ होते आणि पुन्हा पाऊस पडतो. सुषुप्ती अवस्थेला सुद्धा नित्य प्रलय असे म्हटले आहे. गाढ झोपेत सर्व इन्द्रिये जणू काही लोप पावतात. मन आणि चेतना शक्ती मध्ये विलीन होतात आणि सुप्तावस्थेत जातात. जाग आल्यावर पुन्हा कार्यान्वित होतात. गाढ झोप पूर्ण झाल्यावर जणू काही नवीन सुरुवात केल्यासारखे ताजेतवाने वाटते. ह्याचे वर्णन एच एच विल्सन ने दिवा विझणे आणि नव्याने प्रकाशित होणे असे केले आहे. आत्म्याशिवाय जीव निर्माण होऊ शकणार नाही. समस्त योनींमधे (84 लक्ष) जितकी मूर्त स्वरूप शरीरे निर्माण होतात, त्या सर्वांची मूळ (महान योनी) प्रकृति आणि बीज देणारा पिता मी आहे. असे श्रीमद्भगवद्गीतेच्या 14 व्या अध्यायातील 5 व्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी म्हटले आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

हा सर्वांचा ईश्वर आहे, सर्व काही जाणणारा आहे, आंतर मनोवृत्तींचे नियमन करणारा, सर्वांचे उगमस्थान, भूत मात्रांचे उत्पत्तीस्थान आणि लयस्थान आहे.

---

6व्या मंत्रानंतर श्री गौडपादाचार्यांच्या कारिका सुरू होतात. एकूण 215 कारिका त्यांनी 4 प्रकरणात लिहिल्या आहेत त्यापैकी पहिल्या आगम ह्या प्रकरणात एकूण 29 कारिका आहेत. कारिका म्हणजे छंदात्मक पद्य जे मुख्य मुद्याच्या अनुषंगाने लिहिले जाते. येथे त्याला

माण्डूक्य कारिका असे म्हणता येईल. कृ धातु + ण्वुल् प्रत्यय अशी कारिकेची व्युत्पत्ती आहे. कारिका म्हणजे एक प्रकारचे विश्लेषण किंवा टिप्पणी. एखादा सिद्धान्त कमीतकमी शब्दात उलगडून दाखवणे म्हणजे कारिका. संक्षिप्तसूत्रबह्वर्थसूचकः श्लोकः कारिका असे कारिकेचा वर्णन केले आहे. लेख. आणि कारिका मध्ये हाच तो फरक. माण्डूक्य कारिका मधील पहिली कारिका 6 मंत्रांच्या नंतर आली आहे, ह्याचा अर्थ त्या सहा मंत्रांचा गोषवारा येथे दिला असावा. आपण इतके भाग्यवान आहोत की ह्या कारिकांवर आदी शंकराचार्यांनी लिहिलेले भाष्य उपलब्ध आहे. पहिल्या सहा मंत्रासाठी आचार्यांनी नऊ कारिका लिहील्या आहेत, त्यानंतर सातवा मंत्र सुरू होतो.

**बहिष्प्रज्ञो विभुर्विश्वो ह्यन्तःप्रज्ञस्तु तैजसः। घनप्रज्ञस्तथा प्राज्ञ एक एव त्रिधा स्मृतः ॥ K1॥**

विभुः विश्वः बहिष्प्रज्ञो तैजसः हि तु अन्तः प्राज्ञः तथा प्राज्ञः घनप्रज्ञः एक एव त्रिधा स्मृतः

विभुः विश्वः सर्वव्यापी असा

विभु पुं. प्र. ए. व.

विश्वः विश्व पुं. प्र. ए. व.

बहिष्प्रज्ञः बाह्य स्थूल विषय जाणणारा

बहिष्प्रज्ञ पुं. प्र. ए. व.

तैजसः तैजस(सूक्ष्म विषय जाणणारा) तैजस् पुं. प्र. ए. व.

हि खरेच अव्यय

तु परन्तु अव्यय

अन्तः आंतरिक जग अन्त पुं. प्र. ए. व.

प्रज्ञः जाणकार प्रज्ञ पुं. प्र. ए. व.

तथा तसे अव्यय

प्राज्ञः प्राज्ञ पुं. प्र. ए. व.

घनप्रज्ञः जाणीव एकवटलेला

घनप्रज्ञ पुं. प्र. ए. व.

एक

एव नक्की अव्यय

त्रिधा त्रि+धा तीन प्रकारे

स्मृतः ओळखले जातात स्मृ धातु क्त प्रत्यय पुं. प्र. ए. व.

वैश्वानर, तैजस आणि प्राज्ञ म्हणजेच अनुक्रमे जागृती स्वप्नावस्था आणि सुषुप्ति ह्या तीन अवस्थातील आत्म्याचा फरक आपण विस्ताराने समजून घेतला आहे. ह्या तीन अवस्था मध्ये असणारा तो केवळ एकच असतो. थोडक्यात आत्म्याला आपल्या आकलनासाठी तीन भागात विभागले गेले असले तरी तो एकमेव शुद्ध असा आहे आणि प्रत्येक आत्मा, चैतन्यशक्ती त्या शरीरापुरती मर्यादित आहे. कारण प्रत्येक व्यक्तिमधे असणारी चैतन्यशक्ती आणि त्या द्वारे येणारे अनुभव हे दुसऱ्या व्यक्तीला लागू होत नाहीत. आत्म्याचे एकजिनसी स्वरूप स्पष्ट करण्यासाठी शंकरभाष्यामधे बृहद-आरण्यक 4.3.18 आणि 4.3.19 ह्या मंत्रात नमूद केलेल्या महामत्स्यादि (मत्स्य आदी) दृष्टांताचे उदाहरण दिले आहे. जसे एक मोठा मासा नदीच्या दोन्ही किनाऱ्यावर सहज जाऊ शकतो त्याचप्रमाणे जागृत आणि स्वप्न अवस्थेत आत्मा सहजपणे संचार करतो. जसे आकाशात भरारी घेणारा पक्षी सहजतेने आपल्या घरट्यात जाऊन विश्रांती घेतो तसेच आत्मा गाढ निद्रावस्थेत जातो.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

सर्वविश्वव्यापी बहिष्प्रज्ञ, तैजस अन्तःप्रज्ञ आणि घनप्रज्ञ प्राज्ञ असा एकच आत्मा तीन प्रकारे ओळखला जातो.

---

**दक्षिणाक्षिमुखे विश्वो मनस्यन्तस्तु तैजसः | आकाशे च हृदि प्रज्ञास्त्रिधा देहे व्यवस्थितः ||k2||**

दक्षिणाक्षिमुखे विश्वः तैजसः तु मनसि अन्तः प्राज्ञः हृदि आकाशे च देहे त्रिधा व्यवस्थितः

दक्षिणाक्षिमुखे उजव्या डोळ्यात दक्षिणम् अक्षि मुख नपु. स. ए. व.

विश्वः विश्व पु. प्र. ए. व.

तैजसः तैजस् पु. प्र. ए. व.

तु परन्तु अव्यय

मनसि मनात मनस् नपुं. स. ए. व.

अन्तः अन्त पुं. प्र. ए. व.

प्राज्ञः प्राज्ञ पुं. प्र. ए. व.

हृदि हृदय हृद् नपुं. स. ए. व.

आकाशे आकाशात आकाश पुं. स. ए. व.

च सुद्धा अव्यय

देहे शरीरात देह पुं. स. ए. व.

त्रिधा तीन प्रकारे त्रि+धाच् प्रत्यय

व्यवस्थितः स्थित आहेत व्यवस्थित पु. प्र. ए. व.

आत्म्याला निरनिराळ्या उपाधी जोडल्या की त्याचे निरनिराळे पैलू आपल्या समोर येतात जसे देहात्मा, जीवात्मा, परमात्मा. वास्तविक ह्या सर्वांमध्ये आत्मा एकच. माण्डुक्योपनिषदात आत्म्याचे तीन भाग आपण वाचले. त्याला तीन अवस्थांप्रमाणे नावे दिली आहेत जसे वैश्वानर, तैजस आणि प्राज्ञ. आपल्या शरीरात असणाऱ्या पंच प्राणांना त्यांच्या स्थानांप्रमाणे वेगवेगळी नावे दिली आहेत. आपल्या शरीरात असणाऱ्या पंच प्राणांची सुद्धा अशीच निरनिराळी स्थाने मानली जातात.

ह्या कारिकेत तीन आत्म्यांची स्थाने निश्चित केली आहेत. डोळ्यांमध्ये प्राण अधिक काळ राहतो, याला इन्ध असे नाव आहे. [इन्धो ह वै नामैष योऽयं दक्षिणेऽक्षन्पुरुषः (बृहदारण्यक – 4.2.2) नेत्र हे विषयग्रहणाचे प्रमुख द्वार अगर मुख आहे.

येथे उजव्या डोळ्याचा आवर्जून उल्लेख केला आहे जो जास्त शक्तीशाली असावा, ज्यायोगे आपल्याला ज्ञान प्राप्त करणे सोपे होते. म्हणून येथे वैश्वानराचे अस्तित्व आहे. स्वप्नांचा आणि मनाचा घनिष्ठ संबंध आहे. सहाजिकच तैजसाचे वास्तव्य मनात आहे.

आपल्या भावभावनांचा संबंध आपण हृदयाशी जोडतो. भावभावनांचे हिंदोळे आपल्या मनात चालूच असतात पण त्याला जोड लाभते ती विवेकबुद्धी ची. ह्या कारिकेत हृदय आकाश असा शब्दप्रयोग केला आहे.

सुषुप्ती अवस्थेचा आनंदमय कोषाशी संबंध जोडला गेला आहे.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

उजव्या डोळ्यात वास करणारा तो वैश्वानर, मनामध्ये तैजस आणि हृदय आकाशात प्राज्ञ असे एकच आत्मा तीन प्रकारे वास करत असतो.

---

**विश्वो हि स्थूलभुङ्ःनित्यं तैजसः प्रविविक्तभुक् आनंदभुक्तथा प्राज्ञस्त्रिधा भोगं निबोधत || k 3 ||**

विश्वः हि नित्यम् स्थूलभुक् तैजसः प्रविविक्तभुक् आनंदभुक् तथा प्राज्ञः त्रिधा भोगम् निबोधत

विश्वः विश्व पु. प्र. ए. व.

हि परन्तु अव्यय

नित्यम् नेहमी नित्य नपुं. प्र. ए. व.

स्थूलभुक् स्थूल विषयांचे भोग स्थूलभुज् स्त्री. प्र. ए. व.

तैजसः तैजस पु. प्र. ए. व.

प्रविविक्तभुक् सूक्ष्माचा भोग घेणारा प्र+अवि विक्तभुक् विक्तभुज् स्त्री. प्र. ए. व.

भुज् धातु भक्षण करणे

आनंदभुक् आनंद भोगतो आनंदभुज् स्त्री. प्र. ए. व.

तथा तसे अव्यय

प्राज्ञः प्राज्ञ पु. प्र. ए. व.

त्रिधा तीन त्रि+धाच् प्रत्यय

भोगम् भोगाचे अनुभव भोग नपुं. प्र. ए. व.

निबोधत जाणून घ्या नि+बुध् धातु भ्वादिः कर्तरि लोट् लकारः परस्मै पदम् म. पु. ब. व.

आतापर्यंत आपण माण्डुक्योपनिषदात वाचलेले 6 मंत्र आणि 2 कारिका ह्या वरून वैश्वानर तैजस आणि प्राज्ञ यासंबंधी बऱ्यापैकी माहिती आपण करून घेतली. आता ह्या पुढील कारिकेत आणखी वैशिष्ट्ये सांगितली आहेत.

बाह्य इंद्रियांमुळे बाह्य जगाचे म्हणजे स्थूल विषयांचेच ज्ञान होते. इन्द्रियांपेक्षा मन सूक्ष्म आहे. मनाला सूक्ष्म विषयांचे ज्ञान होते. मनात कोरल्या गेलेल्या स्मृतींमुळे स्वप्नावस्थेत सर्व विषयांचा आनंद घेता येतो. सुषुप्ती अवस्थेत जागृत आणि स्वप्नावस्था लोप पावतात. त्यामुळे उरतो तो फक्त आनंद. म्हणून ह्या कारिकेत असे म्हटले आहे की

विश्व हा नित्य स्थूल पदार्थांचा भोक्ता आहे. सूक्ष्म विषयांचे भोग तैजस घेतो आणि प्राज्ञ केवळ आनंदच उपभोगतो. असे तीन अवस्थांतील तीन प्रकारचे भोग असतात ते जाणून घेणे आवश्यक आहे.

---

**स्थूलं तर्पयते विश्वं प्रविविक्तं तु तैजसम् | आनंदश्च तथा प्राज्ञं त्रिधा तृप्तिं निबोधत || k 4 ||**

विश्वम् स्थूलम् तर्पयते तैजसम् तु प्रविविक्तं तथा प्राज्ञम् आनंदः च त्रिधा तृप्तिम् निबोधत।।

विश्वम् विश्व पु. द्वि. ए. व.

स्थूलम् स्थूल नपुं. द्वि. ए. व.

तर्पयते तृप्त होतो तृप्+णिच् चुरादिः कर्तरि लट् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

तैजसम तैजस पु. प्र. ए. व.

तु परन्तु अव्यय

प्रविविक्तम् सूक्ष्म विषयांनी प्र+अवि+विच् धातु क्त प्रत्यय पुं. द्वि. ए. व.

तथा तसे अव्यय

प्राज्ञम् प्रज्ञ+अण् प्रत्यय नपुं. प्र. ए. व.

आनंदः आनंद पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

त्रिधा तीन त्रि+धाच् प्रत्यय

तृप्तिम् तृप्ती तृप्ति स्त्री. द्वि. ए. व.

निबोधत समजून घ्या नि+बुध् धातु भ्वादिः कर्तरि लोट् लकारः परस्मै पदम् म. पु. ब. व.

आधीच्या कारिकेत तीन प्रकारच्या भोगांविषयी सांगितले होते आता ह्या कारिकेत त्याचे परीणाम कसे होतात ह्याचे वर्णन केले आहे. ह्या कारिकेत असे म्हटले आहे की स्थूल विषय विश्वाला तृप्ती देतात, सूक्ष्म विषय तैजस ला संतुष्ट करतात तर प्राज्ञ ला परमानंद तृप्त करतो. तृप्तीचे हे तीन प्रकार समजून घेतले पाहिजे.

---

**त्रिषु धामसु यद्भोज्यं भोक्ता यश्च प्रकीर्तितः । वेदैतदुभयं यस्तु स भुञ्जानो न लिप्यते ॥ k 5॥**

त्रिषु धामसु यत् भोज्यम् भोक्ता यः च प्रकीर्तितः एतद् उभयम् यः तु वेद सः भुञ्जानः अपि न लिप्यते।

त्रिषु तीन त्रि नपुं. स. ब. व.

धामसु अवस्था धामन् नपुं. स. ब. व.

यत् जे यत् नपुं. प्र . ए. व.

भोज्यम् अनुभाव्य भुज् धातु कर्मणि +ण्यत् प्रत्यय  नपुं. प्र. ए. व.

भोक्ता अनुभावक भोक्तृ पुं. प्र. ए. व.

भुज् धातु तृच् प्रत्यय

यः जो यद् पुं. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

प्रकीर्तितः वर्णन केले आहे प्र+कृत् धातु + णिच् + क्त प्रत्यय पुं. प्र. ए. व.

एतद् या एतद् नपुं. प्र. ए. व.

उभयम् दोन्ही उभय पुं. द्वि. ए. व.

यः जो यद् पुं. प्र. ए. व.

तु परन्तु अव्यय

वेद जाणतो विद् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद उ. पु. ए. व.

सः तो तद् पुं. प्र. ए. व.

भुञ्जानः उपभोग भुञ्जान पु. प्र. ए. व.

भुज् धातु शानच् प्रत्यय

अपि सुद्धा अव्यय

न अव्यय

लिप्यते लिप्त होणे लिप् धातु तुदादिः कर्मणि लट् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

3 ऱ्या कारिकेत आपण तीन भोक्ता आणि ते घेत असलेल्या भोगांचे वर्णन वाचले आहे. आता ह्या कारिकेत आत्मसाक्षात्काराचा उल्लेख केला आहे. जागृती, स्वप्न, सुषुप्ति या तीन अवस्था आणि विश्व, तेजस् आणि प्राज्ञ हे त्यांचे भोक्ते आहेत. हे भोग,स्थूल इंद्रिये, सूक्ष्म मन आणि हृदयाकाश यांच्या साहयाने उपभोगले जातात.  भोग्य वस्तू आणि तीन भोक्ता हे केवळ आपल्या विचारांतून आलेले आहेत अन्यथा ते एकच आहेत.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा आहे की

जो तीनही अवस्थांच्या अनुभवाचे विषय आणि अनुभवकर्ता या दोन्ही गोष्टी असे एकच जाणतो, तो ह्या गोष्टींमुळे प्रभावीत होत नाही.

---

**प्रभवः सर्वभावानां सतामिति विनिश्चयः । सर्वं जनयति प्राणश्चेतोंशून् पुरुषः पृथक् ॥ K6 ॥**

सर्वभावानाम् प्रभवः सताम् इति विनिश्चयः प्राणः सर्वम् जनयति पुरुषः चेतोंशून् पृथक्

सर्वभावानाम् सर्व कार्यांचे सर्वभाव पुं. ष. ब. व.

प्रभवः कारण प्र+भू धातु +अच् /अप् प्रत्यय पुं. प्र. ए. व.

सताम् (सत्य) आहे सत् पुं. ष. ब. व.

अस् धातु शतृ प्रत्यय

इति अव्यय

विनिश्चयः निश्चित वि+निस्+चय् धातु +अच्  प्रत्यय पुं. प्र. ए. व.

प्राणः प्राण पुं. प्र. ए. व.

सर्वम् सर्व नपुं. प्र. ए. व.

जनयति जिवंत ठेवतो जन् + णिच् प्रत्यय जुहोत्यादिः कर्तरि लट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

पुरुषः  पुरुष पुं. प्र. ए. व.

चेतोंशून् किरणयुक्त चेतना युक्त

चेतोंशु चेतस्+अंशु द्वि. ब. व.

पृथक् वेगवेगळे अव्यय

थोडेसे विषयांतर, करून विश्वनिर्मितीच्या विषयावर ह्या कारिकेत चर्चा केलेली दिसतेय. शास्त्राच्या साह्याने हे विश्व कसे निर्माण झाले ते सांगता येते पण ते का निर्माण झाले ते कसे सांगणार? जे सत्य आहे, जे अस्तित्वात आहे त्याचाच परिणाम म्हणून निश्चितपणे सर्व भाव निर्माण झाले. एका सत्यापासून अनेक सत्य निर्माण झाली. जे असत्य आहे त्याचे अस्तित्वच नाही हे सांगताना वांझ स्त्रीच्या बालकाचे उदाहरण दिले आहे. श्रीमद्भगवद्गीतेच्या विभूतीयोग नाव असलेल्या 10 व्या अध्यायात श्रीभगवानकृष्णांनी आपणच विश्वनिर्मितीचे मूळ असल्याचे सांगितले आहे. ह्या कारिकेत प्राण आणि पुरुष ह्या दोघांचा उल्लेख केला आहे. निरनिराळ्या पाण्याच्या डबक्यात सूर्याची अनेक प्रतिबिंबे दिसू शकतात. पण सूर्य एकच आहे. ह्या कारिकेत

असे म्हटले आहे की सर्व सत्य वस्तूंचे उत्पत्तिस्थान प्राण असून तोच निरनिराळे भाव निर्माण करतो. तर पुरुष  आपल्या निरनिराळ्या ज्ञानरूपी किरणांनी चराचर सृष्टी निर्माण करतो.

---

**विभूतिं प्रसवं त्वन्ये मन्यन्ते सृष्टिचिन्तकाः ।स्वप्नमायासरूपेति सृष्टिन्यैर्विकल्पिता ॥ K7 ॥**

अन्ये सृष्टिचिन्तकाः विभूतिम् प्रसवम् मन्यन्ते अन्यै तु सृष्टीः स्वप्नमायासरूप इति विकल्पिताः।

अन्ये दुसरे अन्य पुं. प्र. ब. व.

सृष्टिचिन्तकाः सृष्टिच्या निर्मिती बद्द्ल विचार करणारे सृष्टिचिन्तक पुं. प्र. ब. व.

विभूतिम् परमेश्वराची विभूति स्त्री. द्वि. ए. व.

प्रसवम् निर्मिती प्रसव पुं. द्वि. ए. व. प्र+सु धातु +अच् प्रत्यय

मन्यन्ते समजतात मन् धातु कर्तरि प्रयोगः लट् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ब. व.

अन्यै तर आणखी काही अन्य पुं. तृ. ब. व.

तु परन्तु अव्यय

सृष्टीः सृष्टी स्त्री. प्र. ए. व.

स्वप्नमायासरूपा स्वप्नातीत माया रूपी

स्वप्नमायासरूप स्त्री. प्र. ए. व.

मा धातु मानणे

मा धातु +ण= माय.

इति अव्यय

विकल्पिताः कल्पना करतात विकल्पिता स्त्री. प्र. ब. व.

6व्या मंत्रापासून सृष्टीच्या निर्मितीच्या सिद्धांतांची चर्चा सुरू झाली आहे. ह्या मंत्रातील अन्ये या शब्दाचा उपयोग आधीच्या मंत्राचा अर्थ जोडून घेण्यासाठी करायला हवा.

मा धातु 2 ऱ्या, 3 ऱ्या आणि 4 थ्या गणात आहे. तीनही चा अर्थ मोजणे तोलणे अनुमान करणे. त्याला ण प्रत्यय लावला कि मा+ण= माय. प्रथमैकवचने  (पुं) - मायः । (स्त्री) - माया । (नपुं) - मायम् ।अशी तीन लिंगातील रूपे तयार होतात. ह्यातील अनुमान करणे असा अर्थ घेतला तर ह्या मंत्राचा अर्थ समजायला सोपे जाईल.

आधीच्या मंत्रात जनयति असे म्हटले होते येथे प्रसव असे म्हटले आहे. सृष्टीच्या निर्मितीचे चार सिद्धांत आहेत. समस्त जगत आणि जीव ह्यामधे ब्रह्माचा अंश आहे. तोच ह्या निर्मिती चे कारण आहे. ह्या सिद्धांताला परिणामवाद असे म्हटले जाते.

विवर्त चा अर्थ आहे "एक स्पष्ट किंवा भ्रामक रूप". आपल्या मनावरचे माया शक्ती चे आवरण निघून गेले की परमात्म्याची जाणीव होते. श्रीमद्भगवद्गीतेच्या 2 ऱ्या अध्यायातील 16 व्या श्लोकात म्हटल्या प्रमाणे जे सत्य आहे तेच शाश्वत आहे. असत्य चे कधी अस्तित्वच नसते. हाच तो विवर्त वाद.

ज' चा अर्थ आहे 'जन्म', अज' किंवा अजात' चा अर्थ आहे 'अजन्मा'. ह्या सिद्धांतानुसार काहीच निर्माण झाले नाही. हि सृष्टी कधी निर्माणच झाली नाही. सृष्टि ब्रह्माने व्याप्त किंवा अव्याप्त नाही तर सृष्टि म्हणजेच ब्रह्म आणि काहीच नाही. हे स्पष्ट करताना नेहमी मातीच्या मडक्याची उपमा दिली जाते. जसे मडके म्हणजे फक्त मातीचे एक नाव आणि रूप आहे. अजातवाद सुद्धा असेच काहीसे म्हणतो. हि सृष्टी म्हणजे केवळ एक नाव आणि रूप आहे. प्रत्यक्षात ते केवळ ब्रह्मच आहे. अजातवाद हा अद्वैत वेदांत तत्त्वज्ञ गौडपाद यांचा मूलभूत तात्विक सिद्धांत मानला जातो. श्रीमद्भगवद्गीतेच्या 14 व्या अध्यायातील 3 ऱ्या आणि 4 थ्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण स्वतः ब्रह्माचे स्त्रोत आहेत आणि त्यांच्या मुळेच वैविध्यपूर्ण जीवसृष्टी निर्माण होते असे म्हटले आहे.

आरंभवादाच्या सिद्धान्तानुसार, ईश्वर कर्ता आहे आणि त्यानेच ब्रह्मांडातील रचना केली आहे. आणि कर्मानुसार जन्म प्राप्त होतो. न्याय-वैशेषिक दर्शनात आरंभवादाला सहमती दर्शवली आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

सृष्टीच्या निर्मितीचे चिंतन करणारे असे मानतात की, सृष्टी ही परमेश्वराच्या ऐश्वर्याचाच एक विस्तारीत भाग आहे. परंतु असेही एक मत आहे की हे स्वप्नवत माया रूपी अशी काल्पनिक निर्मिती आहे.

---

**मन्यन्तेइच्छामात्रं प्रभोः सृष्टिरिति सृष्टौ विनिश्चिताः । कालात्प्रसूतिं भूतानां मन्यन्ते कालचिन्तकाः ॥ K8 ॥**

सृष्टौ विनिश्चिताः सृष्टीः प्रभोः इच्छामात्रम् इति कालचिन्तकाः भूतानाम् प्रसूतिम् कालात् मन्यन्ते

सृष्टौ सृष्टीची उत्पत्ती सृष्टि स्त्री. स. ए. व.

विनिश्चिताः निश्चयाने वि+निर्+चि धातु निवडणे + क्तः प्रत्यय स्त्री. प्र. ब. व.

सृष्टिः सृष्टि स्त्री. प्र. ए. व.

सृज् धातु निर्माण करणे क्तिन प्रत्यय

प्रभोः परमेश्वराच्या प्रभु पु. ष. ए. व.

इच्छामात्रम् इच्छेने इच्छामात्र नपुं. द्वि. ए. व.

इति अव्यय

कालचिन्तकाः काळाला मानणारे कालचिन्तक पुं. प्र. ब. व.

चिन्त धातु चिंतन करणे

भूतानाम् भूतमात्रांची भूत नपुं. ष. ब. व.

प्रसूतिम् निर्मिती प्र+सू धातु +क्तिन् प्रत्यय स्त्री. द्वि. ए. व.

कालात् कालांतराने काल पुं. पं. ए. व.

कल् धातु कलणे

मन्यन्ते समजतात मन् धातु कर्तरि प्रयोगः लट् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ब. व.

आधीच्या कारिकेत आपण सृष्टीच्या निर्मिती बद्दल विवेचन वाचले. आता ह्या कारिकेत त्याचा संबंध काळाशी जोडला आहे.

काळ नेहमी बदलत राहतो मात्र स्थिति स्थिर असते. महाविस्फोटातून आपले विश्व निर्माण झाले त्याच वेळी काळाची सुद्धा निर्मिती झाली. त्या क्षणापासून विश्वाचा पसारा वाढत गेला, म्हणजे काळ हे बदलाचे द्योतक आहे असे म्हणता येईल. हा बदल कायम भूतकाळातून भविष्यकाळाकडे प्रवास करताना दिसतो आणि हे निरंतर चालू आहे. काळ थांबला असे कधीच होत नाही. म्हणूनच आपण जगलेला क्षण आणि वेळ कायमस्वरूपी निघून जाते. घटनांची सुसंगती लावण्यासाठी काळ हे एकमेव प्रमाण आहे. हि कारिका वाचताना डार्विन च्या सिद्धान्ताची आठवण होते. काळानुरूप सजीवांची उत्क्रांती होत गेली हे डार्विन ने शास्त्रीय दृष्ट्या सांगितले. अगदी मानवी उत्क्रांती चे टप्पे सुद्धा आपल्याला माहीत आहेत, त्याचे पुरावे उपलब्ध आहेत. सजीवांमधे उत्परिवर्तन हे सतत चालू असतेच. अतिशय सूक्ष्म स्वरूपात घडणारे बदल डोळ्यांना दिसण्यासाठी बराच काळ जावा लागतो. असे सूक्ष्म बदल कंपनांच्या सिद्धान्तानुसार स्पष्ट करता येतील. 'ॐ' हा एक पवित्र ध्वनी आहे, ध्वनी म्हणजे कंपन.' शास्त्राचा आधार घेऊन एखादी गोष्ट म्हणजे येथे उत्क्रांती कशी घडली ते सांगता येते पण ती घडण्यामागे प्रयोजन काय हे कसे सांगणार? म्हणजेच आपल्याला परमेश्वराची इच्छा असे म्हणायला वाव आहे.

‘एकोऽहं बहुस्याम् प्रजायेय इति। ‘तैत्तिरीयोपनिषद् 2.6.4।।

आधी ब्रह्म किंवा परमात्मा एकटा होता. त्याला इच्छा झाली,

मग तोच सगळीकडे झाला म्हणजे दृश्यरूपाने जे दिसते आहे ते सगळे त्याच्याच अभिव्यक्तीचा भाग आहे. ते कशासाठी निर्माण केले आहे? या प्रश्नाचे उत्तर ‘तदर्थ एव’ म्हणजे त्याच्यासाठीच असे आहे.

तदर्थ एव दृश्यस्यात्मा ।।पतंजली योग सूत्र 2.21 ।।

दृश्याचे अस्तित्व केवळ द्रष्ट्यासाठीच असते.

उपनिषदात सांगितले आहे की, सर्वांच्या हृदयात बसून तोच ही सृष्टी पाहत असतो किंबहुना या सृष्टीची निर्मिती त्याच्यासाठीच आणि त्यानेच केलेली आहे. ह्या कारिकेत वापरलेल्या प्रभू ह्या शब्दाचा अर्थच प्रकर्षाने असणे.

कोणत्याही कलाकाराची निर्मिती ही त्याच्या इच्छेनेच घडत असते.

येथे उल्लेख केलेल्या भूत ह्या शब्दाचा अर्थ पंचमहाभूतांची निर्मिती असाच घ्यायला हवा.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

परमेश्वराच्या इच्छेनेच ही सृष्टी निर्माण झाली असा सृष्टीचिंतकांचा दावा आहे तर कालचिन्तकांच्या म्हणण्यानुसार सृष्टी कालपरत्वे निर्माण झाली.

---

**भोगार्थं सृष्टिरित्यन्ये क्रीडार्थमिति चापरे । देवस्यैष स्वभावोऽयमाप्तकामस्य का स्पृहा ॥ K 9॥**

अन्ये सृष्टिः भोगार्थम् इति अपरे च क्रीडार्थम् इति एषः देवस्य अयम् स्वभावः आप्त कामस्य का स्पृहा

अन्ये दुसरे अन्य पुं. प्र. ब. व.

सृष्टिः सृष्टि स्त्री. प्र. ए. व.

भोगार्थम् उपभोगासाठी भोगार्थ पुं. द्वि. ए. व.

इति असे अव्यय

अपरे दुसरे अ+पर पुं. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

क्रीडार्थम् ईश्वरी लीलासाठी क्रीडार्थमिति पुं. द्वि. ए. व.

इति अव्यय

एषः तो एतद् पुं. प्र. ए. व.

देवस्य देवाचा देव पुं. ष. ए. व.

अयम् हा इदम् पुं. प्र. ए. व.

स्वभावः स्वभाव पुं. प्र. ए. व.

आप्तकाम संतुष्ट

आप्तः आप्त पुं. प्र. ए. व.

आप् धातु प्राप्त होणे क्त प्रत्यय

कामस्य कामनेच्या काम नपुं. ष. ए. व.

का किम् स्त्री. प्र. ए. व.

स्पृहा इच्छा स्पृह धातु +अच् प्रत्यय स्त्री. प्र. ए. व.

विश्वनिर्मिती बद्दल विवेचन करण्यास 6 व्या कारिकेपासून सुरवात झाली आणि निरनिराळे सिद्धान्त आतापर्यंत आपण वाचले जसे

1. प्राण आणि पुरुष यांनी निरनिराळे भाव आणि चराचर सृष्टी निर्माण केली.

2. सृष्टी म्हणजे परमेश्वराचे ऐश्वर्य.

3. हे जग स्वप्नवत माया रूपी काल्पनिक निर्मिती आहे.

4. परमेश्वराच्या इच्छेने सृष्टी निर्माण झाली.

5. सृष्टी काळाच्या ओघात निर्माण झाली.

आधीच्या कारिकेचा अर्थ वाचल्यावर तात्कालिन विचारप्रवाहांचा अंदाज येतो. श्री गौडपादाचार्यांच्या वेळी सुद्धा फक्त वैज्ञानिक दृष्टिकोन ठेवणारे विचार अस्तित्वात होते असे लक्षात येते आहे. कोणत्याही विचारधारा चा पुरस्कार केला तरी सृष्टिकर्त्याच्या निर्मितीचा हेतू कसा शोधायचा? ह्या सृष्टीच्या निर्मितीचा कार्यकारण भाव विज्ञानाच्या आधारे स्पष्ट करता येत नाही.

एखादी घटना का घडली? त्यामागचे कारण काय होते? का? हे आपण तार्किकतेच्या साह्याने समजून घेऊ शकतो. आता ह्या कारिकेत आणखी नवीन विचार मांडला आहे. सृष्टीची निर्मिती भोगासाठी, आणि परमेश्वराच्या क्रीडेसाठी झाली आहे असा विचार मांडत असतानाच तो किती चुकीचा आहे हे पुढच्याच वाक्यात स्पष्ट केले आहे. सुग्रास अन्न ग्रहण केल्यानंतर पुन्हा जेवणाची इच्छा रहात नाही. मग परीपूर्ण अशा ब्रह्माची कोणती इच्छा अपूर्ण असावी?

ईशावास्योपनिषदातील पहिल्याच मंत्रात 'सर्व जग ईश्वराचे आवास आहे, ह्या सर्वाचा त्याग करून उपभोग घेतला पाहिजे.' असे म्हटले आहे.

चुकीचे वा विपरीत ज्ञान किंवा समजूत म्हणजे

भ्रम. यापासून तयार झालेला शब्द भ्रांती. सर्वात मोठी भ्रांती म्हणजे माया. या मायेच्या आश्रयामुळे जागृति, स्वप्न, सुषुप्ति ह्या अवस्था निर्माण होतात. ह्या तीनही अवस्थांतील आत्मा हा सात्विक जरी असला तरी मायाशक्ती च्या प्रभावाखाली आहे. त्याच मायेमुळे सृष्टीची उत्पत्ती भोगासाठी, क्रीडेसाठी परमेश्वराच्या संकल्पाने, इच्छेने निर्माण झाली अशी संभ्रामक विधाने केली जातात.

स्वभावः म्हणजे स्वस्य भावः असा समर्पक शब्द येथे वापरला आहे. सृजनशीलता हा परमात्म्याचा स्वभाव आहे. जसे अग्नी ची उष्णता, समुद्राच्या लाटा, चंद्राची शीतलता हेच त्यांचे स्वभाव आहेत.

श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या 3 ऱ्या अध्यायातील 22 व्या हेच सांगितले आहे.

न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किञ्चन।

नानवप्तमवाप्तव्यं एव वर्त च कर्माणि।।3.22।।

माझ्या साठी कोणतेही नियत कर्म नाही काही मिळवायचे सुद्‌धा नाही तरी सुद्‌धा मी कर्म करतच असतो. (कारण हाच माझा स्वभाव आहे.)

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की काही जण असे मानतात की हि सृष्टी परमात्म्याच्या उपभोगासाठी आहे, आणि काही जण म्हणतात की ते केवळ परमात्म्याचे मनोरंजन आहे. जो परीपूर्ण असा आहे, त्याच्या काय इच्छा असणार? (सृष्टीची निर्मिती) हा त्याचा स्वभाव आहे.

---

इथून पुढे परत माण्डुक्योपनिषदाच्या 7 व्या मंत्राला सुरवात झाली आहे.

**नान्तःप्रज्ञं न बहिष्प्रज्ञं नोभयतःप्रज्ञं न प्रज्ञानघनं न प्रज्ञं नाप्रज्ञम्।**

**अदृष्टमव्यवहार्यमग्राह्यमलक्षणमचिन्त्यमव्यपदेश्यमेकात्मप्रत्ययसारं प्रपञ्चोपशमं शान्तं शिवमद्‌वैतं चतुर्थं मन्यन्ते स आत्मा स विज्ञेयः ॥7**

न अन्तःप्रज्ञम्। न बहिःप्रज्ञम्। न उभयतःप्रज्ञम्। न प्रज्ञानघनम्। न प्रज्ञम्। न अप्रज्ञम्। अदृष्टम् अव्यवहार्यम् अग्राह्यम् अलक्षणम् अचिन्त्यम् अव्यपदेश्यम् एकात्मप्रत्यसारं प्रपञ्चोपशमम् शान्तं शिवम् अद्वैतं चतुर्थं मन्यन्ते विवेकिनः । सः आत्मा सः विज्ञेयः ॥

न अव्यय

अन्तःप्रज्ञम् आंतरिक जाणिव अन्तःप्रज्ञ प्र+ज्ञा धातु+क प्रत्यय

न अव्यय

बहिःप्रज्ञम् बाह्य जाणिव बहिःप्रज्ञ पुं. द्वि . ए. व.

न अव्यय

उभयतःप्रज्ञम् दोन्ही जाणिवा उभयतःप्रज्ञ पु. द्वि . ए. व.

न अव्यय

प्रज्ञानघनम् जाणीवांचा संग्रह प्रज्ञानघन पुं. द्वि . ए. व.

न अव्यय

प्रज्ञम् जाणता प्रज्ञ  पुं. द्वि . ए. व.

न अव्यय

अप्रज्ञम् जाणिवेचा अभाव अप्रज्ञ पुं. द्वि . ए. व.

अदृष्टम् अव्यक्त अदृष्ट पुं. द्वि . ए. व.

अव्यवहार्यम् देवाणघेवाण न करण्याजोगे अव्यवहार्य पुं. द्वि . ए. व.

अग्राह्यम् ग्रहण न करता येईल असे अग्राह्य पुं. द्वि . ए. व.

अलक्षणम् गुणधर्म नसणारे अलक्षण पुं. द्वि . ए. व.

अचिन्त्यम् विचारांच्या पलिकडे

अचिन्त्य पुं. द्वि . ए. व.

अव्यपदेश्यम् सांगता येणार नाही असे

अव्यपदेश्य पुं. द्वि . ए. व.

एकात्मप्रत्ययसारम् एकात्मतेचे सार एकात्मप्रत्ययसार पुं. द्वि . ए. व.

प्रपञ्चोपशमम् भ्रामक जगाचे निरसन करणारा प्रपञ्च+उपशमम् उपशम पुं. द्वि . ए. व.

शान्तम्  शान्त पुं. द्वि . ए. व.

शिवम् शिव पुं. द्वि . ए. व.

अद्वैतम् अद्वैत पुं. द्वि . ए. व.

चतुर्थं  चतुर्थ नपु. प्र. ए. व.

मन्यन्ते मानले जाते मन् धातु कर्तरि लट् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ब. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

विज्ञेयः विशेष ज्ञान विज्ञेय पु. प्र. ए. व.

आधीचे सहा मंत्र आणि हा सातवा मंत्र यांच्या सादरीकरणात कमालीचा फरक आहे. एखाद्या गोष्टीची व्याख्या दोन प्रकारे करता येते. नकारात्मक आणि सकारात्मक.

हा सातवा मंत्र म्हणजे चतुर्थ पाद म्हणजे तुरिया अवस्था. हि केवळ एक सत्य अवस्था आहे म्हणून त्याचे ठोस असे वर्णन करता येत नाही. ते नेति नेति अशा पद्धतीनेच सांगता येईल. बाकीच्या तीन अवस्था मिथ्या आहेत. तैजस अवस्था म्हणजे स्वप्नावस्था जिचे अस्तित्व झोपेतून जागे झाल्यावर संपते. वैश्वानर म्हणजे जागृत अवस्था मायाशक्तीच्या प्रभावाखाली आहे. तर सुषुप्ती अवस्था केवळ गाढ निद्रेपुरती मर्यादित आहे. ह्या मंत्रात सर्व विधाने नकारार्थी आहेत. आत्म्याची तुरिया अवस्था म्हणजे काय नाही ते स्पष्ट केले आहे. म्हणजे ह्यापैकी जे नाही ती तुरिया अवस्था.

मंत्रामध्ये असलेले प्रत्येक पद अत्यंत महत्त्वाचे आहे. कारण ते आत्म्याचे वर्णन आहे, ॐकाराच्या तुरीय म्हणून मानलेल्या अत्यंत सूक्ष्म आणि महत्त्वाच्या पादाचे ते वर्णन आहे. ह्या मंत्रातील काही शब्द परब्रह्माचे स्वरूप विषद करताना मुण्डकोपनिषदातील 1.1.6 व्या मंत्रात सुद्धा वाचायला मिळतात. जसे अदृश्य, अवर्ण,अग्राह्य.

यत्तदद्रेश्यमग्राह्यमगोत्रमवर्णमचक्षुःश्रोत्रं तदपाणिपादम्।

नित्यं विभुं सर्वगतं सुसूक्ष्मं तदव्ययं यद्भूतयोनि परिपश्यन्ति धीराः ॥ मुण्डकोपनिषद् 1.1.6 ॥परब्रह्माचे स्वरूप अस्ति आणि नास्ति अशा दोन्ही स्वरूपात वर्णन करून सांगितले आहे.

कोणत्याही वैज्ञानिक सत्याच्या पलिकडे असलेली ही शक्ती, अदृश्य आहे. फारफारतर हि निर्माण झालेली सृष्टी ही त्या शक्तीचा अविष्कार असे म्हणता येईल. आपले नेत्र हे दृश्य पाहण्याचे साधन, पण परब्रह्म असे पाहता येत नाही म्हणून ते अदृश्य. परब्रह्माचा अंश म्हणजे आपला आत्मा, तो सुद्धा आपल्याला पाहता येत नाही. जे पाहता येत नाही ते ग्रहण सुद्धा करता येत नाही. म्हणजेच ते अग्राह्य असे आहे. कोणतेही रंगरूप नसलेला, गुणरहित असा अवर्णम्. म्हणूनच तो अलक्षणम् असा सुद्धा आहे. त्याच्या बद्दल कोणतेही लक्षण दिसून येत नाही म्हणून अनुमान काढता येत नाही. जसे नुसता धूर पाहून त्याखाली अग्नी असावा असे अनुमान निघू शकते.

त्याच्याशी कोणतीही देवाणघेवाण शक्य नाही म्हणून तो अव्यवहार्यम् असा आहे. अशा सर्व गुणांमुळे तो अचिन्त्यम् आहे. ज्याचा विचार करता येत नाही, ज्याचे कोणतेही मूर्त स्वरूप डोळ्यासमोर नसल्याने त्याचे कोणत्याही प्रकारे वर्णन करता येत नाही. म्हणून तो अव्यपदेश्यम् असा आहे.

अन्तःप्रज्ञ, बहिःप्रज्ञ, प्रज्ञानघन ह्या शब्दांचे अर्थ आपण आधीच्या मंत्रात वाचले आहेत.

एकात्मतेचा प्रत्यय देणारे तत्व म्हणजे एकात्मप्रत्यसार. ज्याला आत्मज्ञान प्राप्त झाले त्यालाच एकात्मता समजली. परमात्म्याचे सत्यस्वरूप अवर्णनीय आहे. हे सत्यस्वरूप ज्ञानतत्वरूपी आहे. ज्याची फक्त जाणीव व्हायला हवी.

हा आत्मा प्रपंचाचा उपशम करणारा आहे. प्रपंच म्हणजे पाच प्रकारची आपली जगण्याची धडपड. ज्ञान, कर्म, इच्छा, मोह आणि अहंकार हे प्रपंचाचे पाच घटक. यालाच संसार किंवा जग म्हणतात. 'ज' म्हणजे जन्मापासून आणि 'ग' म्हणजे गमनापर्यंत. अशी ही जगण्याची धडपड आपण तीन अवस्थांच्या पलिकडे गेलो की आपोआपच शांत होते. आत्मा नेहमी शांत असतो, त्याला राग लोभ

अशा भावना नसतात. ह्या मंत्रात तुरिया अवस्थेतील आत्म्याला शिव असे म्हटले आहे. शिव चे वर्णन भारतीय तत्वज्ञानात विस्ताराने केले आहे. शिव म्हणजे व्यापकता.

तो स्वयंसिद्ध आहे.

शिव म्हणजे मंगलमय अन् कल्याणस्वरूप असे तत्त्व.

आज्ञाचक्राचा अधिपती

शिव आदिगुरु आहे. गुरुसेवेत असलेल्या शिष्याचा 'आज्ञापालन' हा सर्वांत महत्त्वाचा गुण आहे. अशा दृष्टीने आज्ञाचक्राच्या ठिकाणी असलेले शिवाचे स्थान हे एकप्रकारे शिवाच्या गुरुत्वाचीच साक्ष देते. शिवाचा तृतीय नेत्र (ज्ञानचक्षू) असण्याचे स्थानही तेच आहे. तो भूतकाळ, वर्तमानकाळ आणि भविष्यकाळ या त्रिकाळातील घटना पाहू शकतो. आत्मा हा परमात्म्याचाच अंश आहे. तो एकच आहे म्हणून तो अद्वैत आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

तो (चतुर्थ अवस्थेतील आत्मा) आंतरिक जगाची जाण आहे असा नाही, बाह्य जगाची जाण आहे असा नाही. किंवा उभयतांची जाण आहे असा नाही. तो प्रज्ञ नाही अप्रज्ञ सुद्धा नाही. तो दृश्य स्वरूपात आहे असे नाही. तो व्यवहार करता येईल असा नाही, तो ग्रहण करता येईल असा नाही,त्याचे गुणधर्म सांगता येतील असा नाही, तो चिन्तनीय असा नाही, तो वर्णन करता येईल असा नाही. तो एकात्मता तत्वाचे सार आहे, मिथ्या जगाच्या भ्रमाचे निरसन करणारा आहे तो शांत, स्वयंसिद्ध, अद्वैत असा आहे. ज्याला आत्म्याची तुरिया अवस्था मानली जाते अशा आत्म्याची प्रचिती प्राप्त करून घ्यायची आहे.

---

**निवृत्तेः सर्वदुःखानामीशानः प्रभुरव्ययः ।**

**अद्वैतः सर्वभावानां देवस्तुर्यो विभुः स्मृतः ॥ K10 ॥**

अव्ययः ईशानः प्रभुः सर्वदुःखानाम् निवृत्तेः सर्वभावानां अद्वैतः विभुः देवः तुर्यः स्मृतः

अव्ययः शाश्वत अव्यय पुं. प्र. ए. व.

ईशानः ईशान पुं. प्र. ए. व.

प्रभुः  प्रभुः पुं. प्र. ए. व.

सर्वदुःखानाम्  सर्व दुःखांचा

सर्वदुःख पुं. ष. ब. व.

निवृत्तेः शेवट निवृत्ति स्त्री. पं. ए. व.

सर्वभावानां  सर्व प्राणीमात्रांत सर्वभाव पुं. ष. ब. व.

अद्वैतः अद्वितीय अद्वैत पुं. प्र. ए. व.

विभुः विशेष अस्तित्व (सर्वव्यापी) विभु पुं. प्र. ए. व.

देवः प्रकाशमान देव पुं. प्र. ए. व.

तुर्यः तुर्य पुं. प्र. ए. व.

स्मृतः ओळखला जातो स्मृ धातु क्त प्रत्यय पुं. प्र. ए. व.

सातव्या मंत्रामध्ये आपण तूरिया अवस्थेची ओळख करून घेतली. तुरिया अवस्था हि जीवंत पणातील अवस्था, अतीव सुख शांती प्राप्त करून देणारी. तुरिया अवस्थेतील हा आत्मा प्रपंचाचा उपशम करणारा आहे असे 7 व्या मंत्रात म्हटले होते. प्रपंच म्हणजे आपल्या जगण्यासाठी आवश्यक असे पाच घटक जे मिळवण्यासाठी आपण धडपडत असतो जसे ज्ञान कर्म इच्छा मोह आणि अहंकार.

ईशान ह्या शब्दाचे बरेच अर्थ आहेत. उत्तर आणि पूर्व दिशेच्या मधली दिशा म्हणजे ईशान ज्याचा अर्थ उगवता सूर्य. इष्ट करणारा ईशान म्हणजे ऐश्वर्य.

तुरिया अवस्थेला अद्वितीय असे म्हटले आहे. ह्या अवस्थेत सर्व दुःखे नष्ट झाली आहेत कारण आता आत्मज्ञान झाले आहे. पुन्हा पुन्हा जन्म हेच आपल्या दुःखाचे मूळ कारण. आत्मज्ञानाने परमेश्वराशी एकरूप होणे म्हणजे निव्वळ आनंद.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

शाश्वत परमश्रेष्ठ असा परमेश्वर सर्व दुःखांचे निवारण करतो. सर्व जीवांमधे अद्वितीय असा तो सर्वव्यापी सदाप्रकाशमान असा 'तुरिय' म्हणून ओळखला जातो.

---

**कार्यकारणबद्धौ ताविष्येते विश्वतैजसौ । प्राज्ञः कारणबद्धस्तु द्वौ तौ तुर्ये न सिद्धतः ॥ K 11 ॥**

विश्वतैजसौ तौ कार्यकारणबद्धौ इष्येते प्राज्ञः तु कारणबद्धः तौ द्वौ  तुर्ये न सिद्धतः

विश्वतैजसौ विश्वतैजस् पुं. प्र. द्वि. व.

तौ ते दोघे तद् पुं. प्र. द्वि. व.

कार्यकारणबद्धौ कार्य आणि कारण यांनी उपाधित कार्यकारणबद्ध पुं. प्र. द्वि. व.

इष्येते इच्छा करतात इष् धातु अध्ययन करणे कर्मणि लट् लकारःआत्मने पदम् प्र. पु. द्वि. व.

प्राज्ञः प्राज्ञ पुं. प्र. ए. व.

तु परन्तु अव्यय

कारणबद्धः कारणाने बांधलेला कारणबद्ध पुं. प्र. ए. व.

तौ ते तद् पुं. प्र. द्वि. व.

द्वौ दोघे द्वि. पुं. प्र. द्वि. व.

तुर्ये तुर्य पुं. स. ए. व.

न अव्यय

सिद्धतः निर्देशित सिध् धातु सिद्ध होणे शतृ प्रत्यय पं. ए. व.

तुरिया अवस्थेचे विस्तृत वर्णन आपण 7व्या मंत्रात वाचले आहे. तुरिया अवस्थेत बाह्य आणि आंतरिक जगत, दोन्हीची जाणिव नसते त्या अर्थाने ते वैश्वानर नाही आणि तैजस सुद्धा नाही. तुरिया अवस्थेची अधिक स्पष्टता यावी ह्यासाठी हि कारिका लिहीली असावी. ह्या कारिकेत कार्यकारण आणि कारणबद्ध असे दोन नवीन शब्द वापरले आहेत.

दोन घटना किंवा परिस्थिती ह्यामधील संबंध कार्यकारण असा असू शकतो म्हणजे एका गोष्टीमुळे दुसरी गोष्ट निर्माण होते. वैश्वानराचे वर्णन आपण सार्वभौमिक असे वाचले. 3 ऱ्या मंत्रात आपण

त्याला 7 अंगे आणि 19 मुखे आहेत, ज्यायोगे तो बाह्य जगाचे ज्ञान घेतो असे वाचले. जागृत अवस्था हे त्याचे कार्य क्षेत्र आहे.

आत्म्याचे दुसरे स्वरूप म्हणजे तैजस जो फक्त सूक्ष्म विषयांचा भोक्ता आहे आणि स्वप्नावस्था हेच त्याचे कार्य क्षेत्र होय.

मात्र सुषुप्ती अवस्थेतील आत्म्याचे कार्य क्षेत्र गाढ निद्रावस्था असल्याने आत्मा येथे कोणतेच कार्य करत नाही. म्हणून आत्म्याच्या ह्या अवस्थेला प्राज्ञ असे म्हटले आहे आणि त्याचे वर्णन आनंदभुक् असे केले आहे. म्हणजेच ह्या कारिकेत म्हटल्या प्रमाणे तो फक्त कारण बद्ध आहे. तर वैश्वानर आणि तैजस हे कार्यकारणबद्ध आहेत.

तुरिया अवस्था ह्या सर्वांपेक्षा वेगळी आहे.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

विश्व आणि तैजस हे दोघे कार्यकारण भावाने सिद्ध आहेत तर प्राज्ञ केवळ कारण भावाने. कार्य आणि कारण दोन्ही भाव तुरिया अवस्थेत दिसत नाहीत.

---

**नात्मानं न परांश्चैव न सत्यं नापि चानृतम् ।**

**प्राज्ञः किञ्चन संवेत्ति तुर्यं सत्सर्वदृक्सदा ॥ K 12॥**

प्राज्ञः न आत्मानम् न परान् च एव संवेत्ति न सत्यं न अपि च अनृतम् किञ्चन संवेत्ति तुर्यं सदा सत्सर्वदृक्

प्राज्ञः प्राज्ञ पुं. प्र. ए. व.

न अव्यय

आत्मानम् आत्म्याला आत्मन् पुं. द्वि. ए. व.

न अव्यय

परान् आत्म्याच्या पलिकडे पर पुं. द्वि. ब. व.

च सुद्धा अव्यय

एव नक्की अव्यय

संवेत्ति जाणतो सम्+विद् धातु जाणणे कर्तरि प्रयोगः लट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

न अव्यय

सत्यं सत्य नपुं. द्वि. ए. व.

न अव्यय

अपि सुद्धा अव्यय

च सुद्धा अव्यय

अनृतम् असत्य अनृत नपुं. द्वि. ए. व.

न ऋतं ऋ धातु संपादन करणे

किञ्चन काहिहि किम्+चन नपुं. द्वि. ए. व.

तुर्यं तुर्य नपुं. प्र. ए. व.

सदा अव्यय

सत्सर्वदृक् सर्वज्ञ सत्सर्वदृश् स्त्री. प्र. ए. व.

आधीच्या कारिकेत वैश्वानर तैजस आणि तुरिय ह्यामधील फरक स्पष्ट करून सांगितला होता आता प्राज्ञ आणि तुरिय ह्या मधील फरक स्पष्ट करून सांगितला आहे. सुषुप्ति अवस्था, ज्याला गाढ झोप देखील म्हणतात, ही मनाची एक अवस्था आहे ज्यामधे व्यक्तीला बाह्य जगाचे किंवा स्वतःच्या अस्तित्वाचे भान रहात नाही. या अवस्थेत, इंद्रिये आणि मन यांचे कोणतेही कार्य चालू नसते. म्हणून आधीच्या कारिकेत ह्याचा उल्लेख कारणबद्ध असा केला आहे. अशी व्यक्ती कोणत्याही प्रकारचे स्वप्न सुद्धा पहात नाही हाच तो तैजस आणि वैश्वानर अवस्थेतील फरक. येथे केवळ शांतता अनुभवता येते. विचारशून्य अवस्था आणि अहंकारशून्य अवस्था सुद्धा. काळाचे भान नसणारी अशी ही बेभान अवस्था तसे बघायला गेले तर समाधी अवस्थेच्या जवळ मात्र ज्ञान रहीत. अशा अवस्थेत जाणे भोंदू लोकांना मादक पदार्थांच्या साह्याने सहज शक्य आहे. म्हणूनच

सुषुप्ती अवस्था आदरणीय नाही. ह्या कारणबद्ध अवस्थेचे कारण अविद्या हे आहे. येथे फक्त अंधकार आहे. तुरिया अवस्थेचे तसे नाही. सूर्य जो प्रकाशमान आहे त्याला अंधकार माहितच नाही. तुरिया म्हणजे द्रष्टेपण.

न हि विज्ञातुर्विज्ञातेः विपरिलोपो विद्यते, अविनाशित्वात् । बृहदारण्यकोपनिषत् 4.3.30।।

ज्याला ज्ञान आहे, त्या ज्ञानाचा कधीही नाश होत नाही. जाणणारे इतके प्रखर ज्ञानी आहेत की ते स्वतःच ज्ञान झाले आहेत. आत्म्याचा हा चौथा पाद सर्वांच्याच अंतर्मनात आहे फक्त तो जागृत असायला हवा.

7व्या कारिकेत तुरिया अवस्थेचे विस्ताराने वर्णन केले आहेच. त्यावरून प्राज्ञ आणि तुरिय ह्यामधील नेमका फरक समजून येतो.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

प्राज्ञाला आत्म्याचे ज्ञान नाही त्याचप्रमाणे आत्म्याच्या पलिकडचे सुद्धा. त्याला सत्य किंवा असत्य कळत नाही. परंतु तुरीय मात्र सर्वज्ञ असा आहे.

---

**द्वैतस्याग्रहणं तुल्यमुभयोः प्राज्ञतुर्ययोः ।**

**बीजनिद्रायुतः प्राज्ञः सा च तुर्ये न विद्यते ॥ K 13॥**

प्राज्ञः तुर्ययोः उभयोः द्वैतस्य अग्रहणम् तुल्यम् प्राज्ञः बीजनिद्रायुतः सा च तुर्ये न विद्यते

प्राज्ञः प्राज्ञ पुं. प्र. ए. व.

तुर्ययोः तुर्य ष. द्वि. व.

उभयोः दोघांचे उभ ष. द्वि. व.

द्वैतस्य द्वैताचा द्वैत नपुं. ष. ए. व.

अग्रहणम् अस्वीकार अग्रहण नपुं. द्वि. ए. व.

तुल्यम् सारखाच तुल्य नपुं. द्वि. ए. व.

प्राज्ञः प्राज्ञ पुं. प्र. ए. व

बीजनिद्रायुतः निद्रावस्थेतील अज्ञान बीजनिद्रायुत पुं. प्र. ए. व.

सा ती तद् स्त्री. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

तुर्ये तुर्य स. ए. व.

न अव्यय

विद्यते जाणते विद् धातु  कर्तरि प्रयोगः लट् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

12 व्या कारिकेपासून प्राज्ञ आणि तुरिय ह्या दोन अवस्थांमधील फरक सांगण्यास सुरवात झाली आहे. अविद्या आणि आत्मज्ञान असा स्पष्ट फरक त्या विवेचनात दिसून येतो. दोन गोष्टींमध्ये फरक तेव्हाच सांगितला जातो जेव्हा त्या दोन गोष्टींमध्ये काही साम्य असते. ते साम्य कोणते? तर ह्या कारिकेत असे म्हटले आहे की दोन्ही अवस्था द्वैताचे ग्रहण करत नाहीत म्हणजेच दोन्ही अवस्थात चेतनाशक्ती पासून वेगळेपण नसते. प्राज्ञ म्हणजेच गाढ झोप. त्यामुळे शरीर आणि मनाच्या कोणत्याच पातळीवर कोणतेही कार्य शक्य नाही. पण तुरिया अवस्था मात्र जागेपणी साध्य केलेली कार्यस्तब्धता. तुरीय म्हणजेच अद्वैत, परिवर्तनहीन अशी शुद्ध चेतना. ह्या अवस्थेतून काहीही निर्माण होणार नाहीये. पण प्राज्ञ अवस्थेला मात्र 11 व्या कारिकेत कारणबद्ध असे म्हटले आहे. ह्या कारिकेत त्याला बीजनिद्रायुत असे म्हटले आहे. बीजनिद्रायुत ह्या शब्दाचा अर्थ स्वामी विवेकानंदांनी “वास्तवतेच्या ज्ञानाची अनुपस्थिती” असा सांगितला आहे. निद्रावस्थेतून बाहेर आल्याशिवाय ज्ञान ग्रहण अशक्य आहे. निद्रा म्हणजे झोप याचा साहित्यिक अर्थ अज्ञान असाच आहे.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

प्राज्ञ आणि तुरिय ह्या दोन्ही अवस्थांमधे द्वैत चा अस्वीकार सारखाच. मात्र प्राज्ञ निद्रावस्थेत असल्याने अज्ञानी स्वरूपाचा जी अवस्था तुरिय मध्ये नसते.

---

**स्वप्ननिद्रायुतावाद्यौ प्राज्ञस्त्वस्वप्ननिद्रया ।**

**न निद्रां नैव च स्वप्नं तुर्ये पश्यन्ति निश्चिताः ॥ K 14॥**

आद्यौ स्वप्ननिद्रायुतौ प्राज्ञः तु अस्वप्ननिद्रया निश्चिताः तुर्ये न निद्राम् न एव स्वप्नम् पश्यन्ति।

आद्यौ आधीचे दोन आद्य पुं. द्वि. ए. व.

स्वप्ननिद्रायुतौ स्वप्न आणि निद्रा

स्वप्ननिद्रायुत पुं. द्वि. ए. व.

प्राज्ञः प्राज्ञ पुं. प्र. ए. व.

तु परन्तु अव्यय

अस्वप्ननिद्रया स्वप्न रहीत निद्रा

अस्वप्ननिद्रा स्त्री. तृ. ए. व.

निश्चिताः सत्य जाणणारे निश्चित पुं. प्र. ब. व.

तुर्ये तुर्य पुं. स. ए. व.

न अव्यय

निद्राम् निद्रा स्त्री. द्वि. ए. व.

न अव्यय

एव नक्की अव्यय

स्वप्नम् स्वप्न नपुं. द्वि. ए. व.

पश्यन्ति पाहतात दृश् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ब. व.

विश्वानर, तैजस, प्राज्ञ आणि तुरिय ह्यामधील फरक आता बऱ्यापैकी स्पष्ट झाला आहे. त्यापुढे जाऊन आणखी सूक्ष्म फरक ह्या कारिकेत सांगितला आहे. विश्वानर आणि तैजस ह्यांचा सरळ सरळ संबंध कर्तृत्वाशी आहे, ज्यामध्ये ज्ञानेन्द्रिये आणि कर्मेन्द्रिये यांचे कार्य चालू असते त्यामधून निर्माण होणाऱ्या जाणिवा, सुख-दुःख निर्माण करतात. प्राज्ञ चे तसे नाही. ह्या अवस्थेत इन्द्रियांची कार्ये पूर्णपणे बंद. पण ती समाधी अवस्था नसून अज्ञान, अविज्ञे ची अवस्था. त्याउलट तुरिय

अवस्था म्हणजे उत्कट आत्मज्ञान. वैश्वानर ही खरे तर जागृत अवस्था. आणि तैजस म्हणजे स्वप्न. मग येथे स्वप्ननिद्रा असे का म्हटले असावे? तुरिय म्हणजे सत्य म्हणून वैश्वानर म्हणजे स्वप्न असे म्हणता येईल. सत्य आणि स्वप्न (माया) हाच तर फरक ह्या कारिकेत सांगायचा आहे.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

आधीचे दोन विश्व आणि तैजस क्रमशः स्वप्न आणि निद्रा शी संबंधित आहे. प्रज्ञा म्हणजे स्वप्न रहीत निद्रा. ब्रह्मवेत्ता तुरिय अवस्थेत निद्रावस्था नसते आणि तो स्वप्न सुद्धा पहात नाही.

---

**अन्यथा गृह्णतः स्वप्नो निद्रा तत्त्वमजानतः । विपर्यासे तयोः क्षीणे तुरीयं पदमश्नुते ॥ K 15॥**

स्वप्नः अन्यथा गृह्णतः निद्रा तत्त्वम् अजानतः तयोः विपर्यासे क्षीणे तुरीयं पदम् अश्नुते।

स्वप्नः स्वप्न नपुं. प्र. ए. व.

अन्यथा अव्यय अन्यप्रकारे अन्य+थाल् प्रत्यय

गृह्णतः गृह्णत् नपुं. पं. ए. व.

ग्रह् + शतृँ प्रत्यय

अन्यथा गृह्णतः मिथ्था बोध

निद्रा  निद्रा स्त्री. प्र. ए. व.

तत्त्वम् तत्त्व नपुं. द्वि. ए. व.

अजानतः न जाणणारे अजानत पुं. प्र. ए. व.

तयोः त्या दोन्हींचा तद् नपुं. ष. द्वि. व.

विपर्यासे चुकीचे ज्ञान विपर्यास नपुं. स. ए. व.

क्षीणे क्षीण नपुं. स. ए. व.

तुरीयम् तुरीय नपुं. द्वि. ए. व.

पदम् पद नपुं. द्वि. ए. व.

अश्नुते प्राप्त होते अश् धातु व्यापणे कर्तरि प्रयोगः लट् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

तुरिया अवस्था म्हणजे नक्की कशी आहे ते ह्या कारिकेत सांगितले आहे.

आपल्याला "रज्जु सर्प न्याय" माहीत आहे. भ्रम आणि अज्ञान यांच्या प्रभावाने दोन सारख्या दिसणाऱ्या गोष्टींना आपण वेगवेगळ्या ओळखण्यात चूक करतो ते केवळ अज्ञानामुळे. स्वप्न अवस्थेत आपण आपल्या विचारांच्या भरारी मारून आपल्याला हवे ते पाहू शकतो. कोणत्याही ठिकाणी पोहोचू शकतो. गाढ निद्रावस्थेत आपल्याला कशाचेच भान नसते. आधीच्या कारिकेत आपण तुरिय अवस्थेत निद्रा आणि स्वप्न अवस्था दोन्ही नसतात हे वाचलेले आहे. सत्य स्वरूपाचे विपरीत ज्ञान आणि अविद्या ह्या अर्थाने स्वप्न आणि निद्रा यांचा उल्लेख केलेला आहे. जागृत अवस्थेचा येथे वेगळा उल्लेख केलेला नाही.

"उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत" हे कठोपनिषदातील वचन आपल्याला माहीत आहे. ह्या वचनाचा जागृत अवस्थेशी काही संबंध नाही. त्याचा अर्थ एवढाच की आपण सजगतेने ज्ञान प्राप्त केले पाहिजे. ज्ञानेन्द्रियांद्वारे अनेक प्रकारचे गोळा केलेले ज्ञान आणि सत्यस्वरूपाची जाणीव ह्यामधील फरक समजून घ्यायला हवा. हीच ती तुरिया अवस्था, विपरीत ज्ञानाच्या पलिकडची.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

स्वप्न हे अनेक प्रकारचे (सत्याच्या विपरीत) ज्ञान ग्रहण करणारे असते. तर निद्रावस्था (सत्याचे) तत्व न जाणणारी. हे दोन्ही विपरीत ज्ञान जेव्हा लोप पावते तेव्हा तुरिय अवस्था प्राप्त केली जाते.

---

**अनादिमायया सुप्तो यदा जीवः प्रबुध्यते ।**

**अजमनिद्रमस्वप्नमद्वैतं बुध्यते तदा ॥ K 16॥**

अनादिमायया सुप्तः जीवः यदा प्रबुध्यते तदा अजम् अनिद्रम् अस्वप्नम् अद्वैतम् बुध्यते

अनादिमायया अनादिमाया स्त्री. तृ. ए. व.

सुप्तः निद्रित सुप्त स्वप् धातु + क्तः प्रत्यय पुं. प्र. ए. व.

जीवः जीव पुं. प्र. ए. व.

यदा जेव्हा अव्यय

प्रबुध्यते जागृत होतो प्र+बुध् धातु बोध होणे कर्मणि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

तदा तेव्हा अव्यय

अजम् न जन्मलेला

अज नञ्+जन् धातु नपुं. द्वि. ए. व.

अनिद्रम् अनिद्र नपुं. द्वि. ए. व.

अस्वप्नम् अस्वप्न नपुं. द्वि. ए. व.

अद्वैतम् अद्वैत नपुं. द्वि. ए. व.

बुध्यते प्रचिती येते बुध् धातु कर्मणि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

आतापर्यंत आत्म्याच्या चार अवस्थांचे विस्ताराने विश्लेषण आपण वाचले. सहाजिकच हि सर्वश्रेष्ठ तुरिया अवस्था कशी प्राप्त करून घेता येईल असा प्रश्न मनात येतोच. त्याचे उत्तर अर्थातच मायाशक्ती पाशी येऊन थांबते. तुरिया अवस्था प्राप्त करण्यापूर्वी चे दोन अडथळे आधीच्या कारिकेत सांगितले होते 1. सत्याचे तत्वतः ज्ञानच नसणे 2. सत्याच्या विपरीत ज्ञान असणे.

हे दोन्ही अडथळे जीवात्म्याच्या बाबतीत सांगितले आहेत. मायाशक्ती च्या पलिकडे जो जाऊ शकतो तो तुरिय अवस्था प्राप्त करू शकतो.

ह्या कारिकेत मायाशक्तीला अनादिमाया असे संबोधले आहे. म्हणजेच परमेश्वराप्रमाणेच तिचे अस्तित्व अनादी काळापासून आहे.

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।श्रीमद्भगवद्गीता 7.14।।

प्रकति च्या तीन गुणांनी युक्त  माझी दैवी मायाशक्ति पार करून जाणे अत्यंत कठिण आहे.

तुरिया अवस्थेचे वर्णन ह्या कारिकेत अनेक विशेषणांनी केले आहे जसे अनादी, अनिद्रिस्त,अस्वप्नी आणि अद्वैत.

सुरवातीच्या मंत्रात म्हटल्याप्रमाणे आत्म्याचे चार पाद आपण आपल्या सोयीसाठी केलेले आहेत. म्हणूनच तुरिया अवस्था सुद्धा आपल्याच अंतःकरणाचा भाग आहे.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

अनादिमायेच्या प्रभावाखाली निद्रिस्त असणाऱ्या जीवात्म्याला जेव्हा जागृतता येते तेव्हा अनादी, अनिद्रिस्त अस्वप्नी आणि अद्वैताचा त्याला स्वतःमध्येच साक्षात्कार होतो.

---

**प्रपञ्चो यदि विद्येत निवर्तेत न संशयः । मायामात्रमिदं द्वैतमद्वैतं परमार्थतः ॥ K 17॥**

प्रपञ्चो यदि विद्येत न संशयः निवर्तेत इदम् द्वैतम् मायामात्रम् परमार्थतः अद्वैतम्।

प्रपञ्चः संसार प्रपञ्च पुं. प्र. ए. व.

यदि जर अव्यय

विद्येत सत्य असेल विद् धातु कर्तरि प्रयोगः विधिलिङ् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

न अव्यय

संशयः निःसंशय संशय पुं. प्र. ए. व.

निवर्तेत निवृत्त होईल नि+वृत् धातु कर्तरि प्रयोगः विधिलिङ् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

इदम् हे इदम् नपुं. द्वि. ए. व.

द्वैतम् द्वैत नपुं. द्वि. ए. व.

मायामात्रम् केवळ माया मायामात्र नपुं. द्वि. ए. व.

परमार्थतः परमार्थाच्या दृष्टीने

परम अर्थतः अव्यय

अद्वैतम् अद्वैत नपुं. द्वि. ए. व.

15 व्या कारिकेत 'स्वप्न अन्यथा गृह्णतः' असे म्हटले होते. त्या बद्दल शंका घेण्याचे कारण नाही. स्वप्नावस्थेत आपण अक्षरशः कितीही कल्पनेच्या भराऱ्या मारू शकतो. पण ते सर्व विपरीत ज्ञान होय. 15 व्या कारिकेत ह्या अवस्थेला तुरिय अवस्थेत जाण्याच्या मार्गावरील अडथळा म्हटले आहे.

ह्या जगात रोज निरनिराळे बदल घडत असतात. शाश्वत असे काहीच नाही. शाश्वत आहे ते फक्त ब्रह्म तत्व.

"ब्रह्म सत्य, जगत मिथ्या". जे शाश्वत नाही ते परीवर्तनीय आहे. 7व्या मंत्रात आपण प्रपंच शब्दाचा अर्थ समजून घेतला होता. प्रपंच म्हणजे आपली पाच प्रकारची जगण्याची धडपड. ज्ञान कर्म इच्छा मोह आणि अहंकार, यालाच संसार किंवा जग असे म्हणतात.

15 व्या कारिकेत असे सुद्धा म्हटले आहे की असे विपरीत ज्ञान क्षीण झाल्यावर तुरिया म्हणजे शाश्वत अवस्था प्राप्त होते. हि अशी लोप पावण्याच्या प्रक्रियेनेच असे स्पष्ट होते की ह्या जगाचे अस्तित्व शाश्वत नाही.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

हे जग खरोखर असेलच तर ते अदृश्य होईल कारण हे सर्व द्वैत मायाच आहे. परमार्थात सर्व अद्वैतच आहे.

---

**विकल्पो विनिवर्तेत कल्पितो यदि केनचित् ।**

**उपदेशादयं वादो ज्ञाते द्वैतं न विद्यते ॥ K 18॥**

यदि केनचित् विकल्पः कल्पितः विनिवर्तेत उपदेशात् अयं वादः ज्ञातम् द्वैतम् न विद्यते।

यदि जर अव्यय

केनचित् काही तरी

किम् +चित् नपुं. तृ. ए. व.

विकल्पः पर्याय विकल्प पुं. प्र. ए. व.

कल्पितः कल्पिले कल्पित पुं. प्र. ए. व. कृप् धातु क्त प्रत्यय

विनिवर्तेत निवृत्त होतील वि+नि+वृत् धातु कर्तरि प्रयोगः विधिलिङ् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

उपदेशात् उपदेश म्हणून उपदेश पुं. पं. ए. व.

अयम् हे इदम् पुं. प्र. ए. व.

वादः स्पष्टीकरण वाद पुं. प्र. ए. व.

ज्ञाते ज्ञात झाल्यावर ज्ञा धातु +क्त प्रत्यय नपुं. स. ए. व.

द्वैतम् द्वैत नपुं. प्र. ए. व.

न अव्यय

विद्यते रहाते विद् धातु कर्तरि लट् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

परमार्थात सर्व अद्वैतच आहे असे आपण आधीच्या कारिकेत वाचले. हे जग शाश्वत नाही असे सुद्धा आपण आधीच्या कारिकेत वाचले आहे. सत्याचे विपरीत ज्ञान हा तुरिय अवस्थेत जाण्या आधी चा मोठा अडथळा. व्यक्ती तितक्या प्रकृती ह्या उक्तीप्रमाणे निरनिराळ्या कल्पना येत असतात. त्या सर्वांच्या पलिकडे जाऊन आत्मबोधाचा अनुभव घ्यायचा आहे. जो त्या जीवात्म्यापुरता मर्यादित आहे. गुरू आणि ग्रंथ आपल्याला परमार्थाचा मार्ग दाखवत असतात. मात्र आत्मबोधाचा अनुभव जीवात्मा एकटाच घेत असतो. मायाशक्तीच्या प्रभावाखाली असलेला निद्रिस्त जीवात्मा जागृत झाला आहे. एकदा आत्मज्ञान झाले की द्वैतवाद मुळापासून संपतो.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

काहीतरी कल्पना केली असल्यास ती नाहीशी होते. हे केवळ उपदेशाकरता स्पष्टीकरण आहे. ज्ञानप्राप्ती झाल्यावर द्वैत रहात नाही.

---

**सोऽयमात्माध्यक्षरमोङ्कारोऽधिमात्रं पादा मात्रा मात्राश्च पादा अकार उकारो मकार इति ॥8 ॥**

सः अयम् आत्मा अध्यक्षरम् ओङ्कारः । अधिमात्रम् पादाः मात्राः मात्राः च पाद अकारः उकारः मकारः इति ॥

सः तो तद् पु. प्र. ए. व.

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

आत्मा आत्मन् पु. प्र. ए. व.

अध्यक्षरम् प्रधान अक्षर अधि अक्षरम्  नपु. प्र. ए. व.

ओङ्कारः ओङ्कार पु. प्र. ए. व.

अधिमात्रम् अधिमात्र नपु. प्र. ए. व.

पादाः पाद पु. प्र. ब. व.

मात्राः मात्रा स्त्री. प्र. ब. व.

मात्राः मात्रा स्त्री. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

पादः पाद पु. प्र. ए. व.

अकारः अकार पु. प्र. ए. व.

उकारः उकार पु. प्र. ए. व.

मकारः मकार पु. प्र. ए. व.

इति असे अव्यय

ह्या उपनिषदातील पहिल्या मंत्रात ॐकाराची व्याप्ती स्पष्ट केली आहे. ॐकारात समाविष्ट असलेले चार भाग आणि त्या मध्ये असलेल्या अ, उ, म् आणि चंद्रबिंदू यांचा समावेश आपल्याला माहीत आहे. त्यानंतर च्या पुढिल मंत्रांत आपण आत्म्याचे चार विभाग म्हणजे पाद (वैश्वानर, तैजस, प्राज्ञ आणि तुरिय) यासर्व गोष्टींचा विस्ताराने उल्लेख वाचला. आता येथून पुढिल मंत्रांत ॐकाराचा गर्भित अर्थ आपल्याला वाचायला मिळणार आहे.

आधीच्या मंत्रात आत्म्याचे  विज्ञेय आत्मा म्हणजे जाणता आत्मा असा उल्लेख केला आहे. त्याच आत्म्याचे मूर्त रूप ॐकार ह्या अक्षरात मांडण्यात आले आहे. श्रीमद्भगवद्गीतेच्या 8 व्या अध्यायातील 13 व्या श्लोकाप्रमाणे ॐकाराचे उच्चारण परम गती प्राप्त करून देते.

ह्या मंत्रात अधि अक्षर आणि अधिमात्र असे दोन शब्द ॐकारासाठी वापरले आहेत. अधिमात्र शब्दाचा अर्थ ज्याच्या मात्रा उत्कृष्ट आहेत. ( अधि ); त्याचे सर्व भाग अनंत आहेत (माधवाचार्य).

ॐ हे व्याकरणदृष्ट्या एकच अक्षर असले तरी त्यात तीन अक्षरे आणि चंद्रबिंदू दडलेले आहेत. वैश्वानर तैजस आणि प्राज्ञ ह्या आत्म्याच्या 3 अवस्था आणि त्यासर्वांच्या पलिकडे तुरिय

आत्म्याच्या तीन अवस्था आणि ॐकाराच्या 3 मात्रा असा परस्पर संबंध येथे सूचित केला आहे. ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

तो हा (अविनाशी) आत्मा ज्याचे मूर्त स्वरूप ॐ, अक्षर आहे, ज्याचे मात्रांच्या दृष्टीने तीन भाग (पाद) जे आत्म्याचे तीन पाद अकार उकार आणि मकार असे आहेत.

---

**जागरितस्थानो वैश्वानरोऽकारः प्रथमा मात्रा।**

**आप्तेरादिमत्वाद् वा आप्नोति ह वै सर्वान् कामानादिश्च भवति य एवं वेद ॥9 ॥**

जागरितस्थानः वैश्वानरः अकारः प्रथमा मात्रा। आप्तेः आदिमत्वात् वा यः एवम् वेद। ह वै सर्वान् कामान् आप्नोति। आदि च भवति ॥

जागरितस्थानः जागृत अवस्था जागरितस्थान पु. प्र. ए. व.

वैश्वानरः वैश्वानर पु. प्र. ए. व.

अकारः पु. प्र. ए. व.

प्रथमा स्त्री. प्र. ए. व.

मात्रा मात्रा स्त्री. प्र. ए. व.

आप्तेः व्यापलेले आप्ति स्त्री. पं. ए. व.

आदिमत्वात् प्रथम तत्वात आदिमत्व नपु. पं. ए. व.

वा किंवा अव्यय

यः जो यद् पु. प्र. ए. व.

एवम् हा एव नपु. प्र. ए. व.

वेद जाणतो विद् धातु कर्तरि लट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

ह खरोखर

वै

सर्वान् सर्व पु. द्वि. ब. व.

कामान् कामना काम पु. द्वि. ब. व.

आप्नोति प्राप्त करतो आप् धातु कर्तरि लट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

आदि प्रथम आदि नपु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

भवति होतो भू धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

आधीच्या मंत्रात ॐकार म्हणजे निराकार स्वरूपाचे सगुण साकार असे प्रतिकात्मक रूप आहे ज्याला आकार आणि ध्वनी अशी दोन अंगे आहेत, हे आपण पाहिले. आता इथून पुढिल मंत्रांत ॐकाराचे तीन भाग अकार उकार आणि मकार आणि आत्म्याचे तीन पाद यांची सुसंगती लावलेली पहायची आहे.बाळ जन्माला आले की त्याचबरोबर त्याची जागृत अवस्था सुरू होते.

अकार आणि जागृत अवस्थेचा स्वामी वैश्वानर यांची सांगड ह्या मंत्रात घातलेली दिसते.  म्हणजेच दोन्ही गोष्टीमधला समान दुवा काय आहे ते आपल्याला जाणून घ्यायचे आहे.

अक्षरानामकारोऽस्मि। अक्षरातील अकार मी (श्रीभगवानकृष्ण) आहे असे श्रीमद्भगवद्गीतेच्या 10 व्या अध्यायातील 33 व्या श्लोकात आपण वाचले आहे.

अकारो वै सर्वा वाक्।' ऐतरेय उपनिषद् 2.3.19 समस्त वाक्यांमध्ये अकार अंतर्भूत असतो.

मूल जन्माला आले की त्याच्या तोंडून बाहेर पडणारा पहिला ध्वनी हा अकारच असतो. त्यानंतर उच्चारलेल्या कोणत्याही व्यंजनात अकार आहेच.  Sky is the limit ह्या उक्ती प्रमाणे जागृत अवस्था विश्वव्यापी आहे. आप्त म्हणजे आपल्या जवळचे सगेसोयरे. एकदा 'वसुधैव कुटुंबकम्' असे मान्य केले की वैश्वानराचे विश्वव्यापी स्वरूप लक्षात येते. नेमका हाच अर्थ ह्या मंत्रात अपेक्षित आहे. जागृत अवस्थेतील अनुभवाशिवाय स्वप्न अवस्था संभव नाही. तसेच प्राज्ञ म्हणजे कर्तृत्व शून्य अज्ञानी अवस्था. ह्यातून बाहेर पडण्यासाठी जागृत अवस्थेतच जावे लागते. म्हणजे पारमार्थिक उन्नती साठी जागृत अवस्थेला नाकारता येत नाही. (स्वप्नावस्था नसेल तर काही फरक पडेल का?) आपल्या रोजच्या दिनचर्येत निद्रावस्थेसाठी फक्त आठ तास अपेक्षित आहेत. म्हणून जागृत अवस्थेला प्रथम स्थान प्राप्त झाले आहे. 'सावधान', 'जागते रहो' ह्या शब्दांचे अध्यात्मिक अंगाने अर्थ शोधायला हवे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

जागृत स्थानी वास्तव्य करणारा वैश्वानर आणि ॐकारातील अकार दोन्ही प्रथम आणि सर्वव्यापी आहेत, हे जो जाणतो त्याच्या खरोखर सर्व कामना पूर्ण होतात आणि तो सर्वांमध्ये अग्रस्थानी असतो.

---

**स्वप्नस्थानस्तैजस उकारो द्‌वितीया मात्रा उत्कर्षादुभयत्वाद् वा उत्कर्षति ह वै ज्ञानसन्ततिं समानश्च भवति नास्याब्रह्मवित् कुले भवति य एवं वेद ॥10**

स्वप्नस्थानः तैजसः उकारः द्‌वितीया मात्रा। उत्कर्षात् उभयत्वात् वा। यः एवं वेद ह वै ज्ञानसन्ततिं उत्कर्षति। समानः च भवति। अस्य कुले अब्रह्मवित् न भवति ॥

स्वप्नस्थानः स्वप्नस्थान पु. प्र. ए. व.

तैजसः तैजस पु. प्र. ए. व.

उकारः उकार पु. प्र. ए. व.

द्‌वितीया दुसरा द्‌वितीया स्त्री. प्र. द्‌वि . व.

मात्रा वर्ण मात्रा स्त्री. प्र. ए. व.

उत्कर्षात् श्रेष्ठत्वामुळे उत्कर्ष पु. पं. ए. व.

उभयत्वात् दोहोंच्या मधे असण्याने उभयत्व पु. पं. ए. व.

वा किंवा अव्यय

यः जो यद् पु. प्र. व.

एवम् हे एव नपु. प्र. ए. व.

वेद जाणतो विद् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

ह वै

ज्ञानसन्ततिम् श्रेष्ठ ज्ञानाचा प्रसार ज्ञानसन्तति स्त्री. द्वि. ए. व.

उत्कर्षति उत्कर्ष होतो उत्+कृष् धातु कर्तरि लट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

समानः समान पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

भवति होतो भू धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

अस्य ह्याच्या इदम् नपु. ष. ए. व.

कुले कुळात कुल नपु. स. ए. व.

अब्रह्मवित् ब्रह्म न जाणणारा अब्रह्मवित् नपु. प्र. ए. व.

न अव्यय

भवति होतो भू धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

ह्या मंत्रातील ज्ञान संतती हा शब्द लक्ष वेधून घेणारा आहे. संतती ह्या शब्दाचा चा अर्थ विस्तार होणे. येथे ज्ञानाच्या विस्तार होतो असा उल्लेख केला आहे. जागृत अवस्थेत ज्ञान ग्रहण करण्याची क्रिया घडत असते. बहिष्प्रज्ञ अशा वैश्वानराला एकोणीस मुखे आहेत असे आपण आधीच वाचले आहे. आधीच्या मंत्रात स्वप्नावस्थेची काय आवश्यकता आहे असा प्रश्न उपस्थित झाला होता, त्याचे उत्तर ह्या मंत्रात सांगितले आहे. बाह्य जगतापासून ग्रहण केलेले ज्ञान आंतरजगतात झिरपून घेतले जात आहे ते तैजस च्या साह्याने. ह्या अवस्थेत फक्त मन आणि

बुद्धी कार्यरत आहेत आणि हा आत्मा सूक्ष्माचे ग्रहण करणारा आहे. जणू काही बाह्य जगता बरोबर मनाची स्पंदने निर्माण होत आहेत. अशा संपादन केलेल्या ज्ञानामुळे ज्ञानसंवर्धनाची क्रिया चालू आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

तैजस, ज्याचे कार्यक्षेत्र स्वप्न अवस्था आहे, तो उ (उकार) आहे, जे (ओम् चे) दूसरे अक्षर आहे, त्याचे श्रेष्ठत्व (अकार पेक्षा) श्रेष्ठ असल्याने आणि (अकार व मकार) दोन्ही च्या मध्ये असल्याने. जो हे जाणतो, त्याचे ज्ञानसंवर्धन होते. आणि तो ज्ञानी गणला जातो. त्याच्या कुळात ब्रह्म न जाणणारा असा कोणी जन्माला येत नाही.

---

**सुषुप्तस्थानः प्राज्ञो मकारस्तृतीया मात्रा मितेरपीतेर्वा मिनोति ह वा इदं सर्वमपीतिश्च भवति य एवं वेद ॥11**

सुषुप्तस्थानः प्राज्ञः तृतीया मात्रा मकारः। मितेः अपीते वा यः एवम् वेद ह वा इदं मिनोति। सर्वम् अपीतिः च भवति ॥

सुषुप्तस्थानः सुषुप्ति हे कार्यक्षेत्र

सुषुप्तस्थान पु. प्र. ए. व.

प्राज्ञः प्राज्ञ पु. प्र. ए. व.

तृतीया तिसरी तृतीया स्त्री. प्र. ए. व.

मात्रा मात्रा स्त्री. प्र. ए. व.

मकारः मकार पु. प्र. ए. व.

मितेः परीमाण मिति स्त्री. पं. ए. व.

मा धातु मोजणे+भावे क्तिन्

अपीते गिळंकृत अपि+इ धातु क्त प्रत्यय पु. स. ए. व.

वा किंवा अव्यय

यः जो यद् पु. प्र. ए. व.

एवम् हे एव नपु. प्र. ए. व.

वेद जाणतो विद् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

ह वा खरोखर

इदम् हे इदम् नपु. प्र. ए. व.

मिनोति जाणतो मि धातु पसरणे कर्तरि लट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

सर्वम् सर्व नपु. प्र. ए. व.

अपीतिः प्रवेश करणे, प्रलय अपीति अपि+इ धातु+क्तिन् प्रत्यय स्त्री. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

भवति होतो भू धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

हा मंत्र वाचला की लहानपणी पेटत्या उदबत्तीचे टोक जोरात गोल गोल फिरवले असता जो गोलाकार दिसत असे त्या आकृती ची आठवण होते.

ॐकाराचे सुद्धा शीघ्र गतीने उच्चारण केले असता फक्त मकार ऐकू येतो. ॐकाराच्या उच्चारात मकार अंतिम ध्वनी आहे, तो अ आणि उ ला व्यापून टाकतो तसेच जागृत अवस्था आणि स्वप्न अवस्था गाढ निद्रावस्थेत विलीन होतात.

गाढ निद्रा हे चांगल्या स्वास्थ्याचे लक्षण आहे मात्र ह्या स्थितीत ज्ञान ग्रहण करण्याची क्रिया थांबलेली असते. विश्व आणि तैजस् यांचे मूल्यमापन प्राज्ञ स्थितीत होत असते. गाढ निद्रेचा अभाव म्हणजे शांती ढळलेले मन, जे विश्व आणि तैजस् अवस्थेत कार्यरत आहे. एखाद्या गोष्टीची उत्पत्ती, त्याचा विनियोग आणि त्याचा लय किंवा विनाश हा सृष्टीचा नियम आहे. हा नियम पाळूनच तुरिया अवस्थेकडे जायचे आहे.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

प्राज्ञ, ज्याचे कार्यक्षेत्र सुषुप्ति आहे,  ती ॐकाराची  तिसरी मात्रा मकार आहे, कारण हे एक परीमाण आणि प्रलय सुद्धा आहे. हे जो जाणतो, तो यथार्थ ज्ञान प्राप्त करून घेतो आणि त्याच्याशी तादात्म्य पावतो.

---

**विश्वस्यात्वविवक्षायामादिसामान्यमुत्कटम्। मात्रासंप्रतिपत्तौ स्यादाप्तिसामान्यमेव च ॥ K 19॥**

विश्वस्य मात्राः संप्रतिपत्तौ स्यात् अत्व विवक्षायाम् आदि सामान्यम् उत्कटम् आप्ति सामान्यम् एव च

विश्वस्य विश्व पुं. प्र. ए. व.

मात्राः मात्रा स्त्री. प्र. ब. व.

संप्रतिपत्तौ लाभ, उपलब्धि

संप्रतिपत्तिः स्त्री. स. ए. व.

सम्+प्रति+पद् धातु +क्तिन् प्रत्यय

सम् च प्रति च

स्यात् असल्यास अस् धातु कर्तरि विधीलिङः प्र. पु. ए. व.

अत्व अ +त्व 'अकार 'पण 'अ' चा भाव

विवक्षायाम् वर्णनांत वच् धातु बोलणे + सन् + अच् प्रत्यय

विवक्षा स्त्री. स. ए. व.

आदि प्रथम अव्यय

सामान्यम् समानता समानत्व सामान्य नपुं. द्वि. ए. व.

उत्कटम् उघडपणे उत्कट नपुं. द्वि. ए. व.

आप्ति व्याप्ती आप् धातु + क्तिन् स्वादि गणः स्त्री. प्र. ए. व.

सामान्यम् समानता सामान्य नपुं. द्वि. ए. व.

एव नक्की अव्यय

च सुद्धा अव्यय

8 व्या मंत्रांच्या आधी आपण 18 कारिका वाचल्या. त्यानंतर 8 ते 11 हे मंत्र वाचले. आता त्यानंतर 19 वी कारिका सांगितली आहे. अर्थातच 8 ते 11 ह्या मंत्रांचे विवेचन आपण 19 ते 23 ह्या कारिकांमधे वाचणार आहोत. 8 व्या मंत्रात आपण आत्म्याच्या तीन अवस्था आणि ॐकाराच्या 3 मात्रांचा परस्पर संबंध आहे असे वाचले.

त्यानंतर 9 व्या मंत्रात वैश्वानर आणि ॐकारातील अकार ह्यांच्यातील साम्य पाहिले.

आता ह्या कारिकेत ॐकाराची पहिली मात्रा 'अ' आणि सर्व प्रथम असणारे आत्म्याचे जागृत अवस्थेतील वैश्वानर हे रूप ह्या दोन्ही मध्ये असणारा समान दुवा म्हणजे त्याचे आदित्व आणि व्यापकत्व हे दोन गुण ठळकपणे सांगितले आहेत. ध्यान हा उपासनेचा मार्ग आहे. आत्म्याचे ध्यान करणे सोपे जावे म्हणून त्याचे प्रतिकात्मक ध्यान ॐकाराच्या स्वरूपात करावे असा प्रघात आहे. म्हणूनच ॐकाराचे अकार, उकार, मकार आणि अर्धचन्द्रबिंदू असे भाग केले आहेत. त्यातील पहिला भाग म्हणजे अकार. आत्म्याचा प्रथम भाग म्हणजे वैश्वानर. अकार आणि वैश्वानर दोन्ही सर्वव्यापी आहेत. हे सर्व आपण 9 व्या मंत्रात विस्ताराने वाचले आहे.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

विश्व आणि अ त्व यांच्या समानतेचे वर्णन करणारे दोन मुख्य आधार आहेत, पहिले दोघांचे आदित्व (प्रथम स्थान) आणि दुसरे म्हणजे दोघांचे व्यापकत्व.

---

**तैजसस्योत्वविज्ञान उत्कर्षो दृश्यते स्फुटम् ।**

**मात्रासंप्रतिपत्तौ स्यादुभयत्वं तथाविधम् ॥ K 20॥**

तैजसस्य मात्रासंप्रतिपत्तौ स्यात् उत्व विज्ञान उत्कर्षः स्फुटम् दृश्यते तथा उभयत्वम् विधम्

तैजसस्य तैजस पुं. ष. ए. व.

मात्राः मात्रा स्त्री. प्र. ब. व.

संप्रतिपत्तौ लाभ संप्रतिपत्तिः स्त्री. स. ए. व.

स्यात् असल्यास अस् धातु कर्तरि विधीलिङः प्र. पु. ए. व.

उत्व उ+त्व उ चा भाव

विज्ञानम् विशेष ज्ञान विज्ञान नपुं. द्वि. ए. व.

वि+ज्ञा धातु

उत्कर्षः श्रेष्ठ उत्कर्ष पुं. प्र. ए. व.

स्फुटम् स्पष्ट स्फुट नपुं. द्वि. ए. व.

दृश्यते दिसते दृश् धातु कर्मणि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

तथा तसे अव्यय

उभयत्वम् दोघांचे उभयत्व नपुं. द्वि. ए. व.

विधम् प्रणाली विध नपुं. द्वि. ए. व.

10 व्या मंत्रात ज्ञान संतती असा शब्द तैजस अवस्थेसाठी वापरलेला आपण वाचले. बाह्य जगातील ज्ञान आपल्या आंतर्मनात झिरपून घेण्याचे काम ह्या अवस्थेत घडत असते. म्हणून हि अवस्था वैश्वानर पेक्षा श्रेष्ठ. अकार पेक्षा उकार श्रेष्ठ.

म्हणून ह्या कारिकेत असे म्हटले आहे की

उकार च्या समान तैजस च्या स्वरूपाचे ज्ञान करून घ्यायचे झाल्यास दोघांची श्रेष्ठता स्पष्ट पणे दिसून येते तसेच दुसरे वैशिष्ट्य म्हणजे दोघांचे (अकार आणि मकार च्या मध्ये वैश्वानर आणि प्राज्ञ च्या मधे) मध्ये असणे.

---

**मकारभावे प्राज्ञस्य मानसामान्यमुत्कटम् ।**

**मात्रासंप्रतिपत्तौ तु लयसामान्यमेव च ॥ K 21॥**

प्राज्ञस्य मात्रासंप्रतिपत्तौ मकारभावे मानसामान्यम् उत्कटम् लय सामान्यम् तु एव च

प्राज्ञस्य प्राज्ञ पुं. ष. ए. व.

मात्राः मात्रा स्त्री. प्र. ब. व.

संप्रतिपत्तौ लाभ संप्रतिपत्ति स्त्री. स. ए. व.

मकारभावे मकारभाव पुं. स. ए. व.

मानसामान्यम् मानसामान्य नपुं. द्वि. ए. व.

उत्कटम् उत्कट नपुं. द्वि. ए. व.

लयः लय पुं. प्र. ए. व.

सामान्यम् सामान्यतः सामान्य नपुं. द्वि. ए. वव

तु परन्तु अव्यय

एव नक्की अव्यय

च सुद्धा अव्यय

6 व्या मंत्रात प्राज्ञ ला चेतोमुख असे संबोधले होते जे जागृत अवस्था आणि स्वप्नावस्था यामधे प्रवेश करण्याचे द्वार असा उल्लेख आपण वाचला होता. गाढ झोपेत सर्व इन्द्रिये लोप पावतात, मन आणि चेतना शक्ती मध्ये विलीन होतात तसेच मकारा मध्ये ॐकाराच्या आधीच्या दोन मात्रा विलीन होतात. तसेच 11 व्या मंत्रात आत्म्याच्या दोन अवस्थांचे परीमाण म्हणजे प्राज्ञ अवस्था असे आपण वाचले होते.

ह्या कारिकेत असे म्हटले आहे की प्राज्ञ चे ॐकारातील मात्रांनुसार ज्ञान करून घ्यायचे झाल्यास मकार भावात (आधीच्या दोन्ही चे) मापन असण्याचे समानत्व तसेच लयास जाण्याची समान अवस्था दिसून येते.

---

**त्रिषु धामसु यत्तुल्यं सामान्यं वेत्ति निश्चितः । स पूज्यः सर्वभूतानां वन्द्यश्चैव महामुनिः ॥ K 22॥**

त्रिषु धामसु यत् सामान्यम् तुल्यम् निश्चितः वेत्ति  सः सर्वभूतानाम् पूज्यः वन्द्यः च एव महामुनिः।

त्रिषु तिन्ही त्रि स. ब. व.

धामसु अवस्था धाम नपुं. स. ब. व.

यत् जो नपुं. प्र. ए. व.

सामान्यम् समान सामान्य नपुं. प्र. ए. व.

तुल्यम् तुल्यबळ तुल्य नपुं. प्र. ए. व.

निश्चितः निःसंशय निश्चित पुं. प्र. ए. व.

वेत्ति जाणतो विद् धातु जाणणे कर्तरि प्रयोगः लट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

सः तो तद् पुं. प्र. ए. व.

सर्वभूतानाम् सर्व सजीवांना सर्वभूत नपुं. ष. ब. व.

पूज्यः पूजनीय पूज्य पुं. प्र. ए. व.

वन्द्यः वंदनीय वन्द्य पुं. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

एव नक्की अव्यय

महामुनिः श्रेष्ठ मुनी महामुनि पुं. प्र. ए. व.

आतापर्यंतच्या मंत्रात आणि कारिकेत आत्म्याच्या तीन अवस्था आणि ॐकाराच्या तीन मात्रा यांची वैशिष्ट्ये आणि परस्पर संबंध यावर विस्ताराने वाचले. ते पूर्णपणे समजून घेतले असता त्याची फलश्रुती काय, ह्याचे वर्णन ह्या कारिकेत केले आहे.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

जाणिवांच्या तीनही अवस्थांची समान लक्षणे जो निःशंकपणे जाणतो तो सर्व भूत मात्रांना पूजनीय आणि वंदनीय असतोच शिवाय श्रेष्ठ मुनी सुद्धा असतो.

---

**अकारो नयते विश्वमुकारश्चापि तैजसम् ।**

**मकारश्च पुनः प्राज्ञं नामात्रे विद्यते गतिः ॥ K23 ॥**

अकारः विश्वम् नयते उकारः च अपि तैजसम् मकारः च पुनः प्राज्ञम् अमात्रे न गतिः विद्यते

अकारः अकार पुं. प्र. ए. व.

विश्वम् विश्व नपुं. प्र. ए. व.

नयते नेतो नी धातु प्राप्त होणे कर्तरि प्रयोगः लट् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

उकारः उकार पुं. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

अपि सुद्धा अव्यय

तैजसम् तैजस नपुं. प्र. ए. व.

मकारः मकार पुं. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

पुनः पुन पुं. प्र. ए. व.

प्राज्ञम् प्राज्ञ नपुं. प्र. ए. व.

अमात्रे मात्रा विरहित अमात्र नपुं. स. ए. व.

न अव्यय

गतिः गम् धातु जाणे + भावेक्तिन् प्रत्यय

विद्यते जाणतो विद् धातु जाणणे कर्तरि प्रयोगः लट् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

आतापर्यंत आत्म्याच्या तीन अवस्था आणि त्यांचा ॐकाराच्या तीन मात्रांशी असणारा परस्पर संबंध ह्यावर विस्ताराने वाचून झाले आहे. तेच सर्व सारांशाने ह्या कारिकेत सांगितले आहे.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

अकाराचे ध्यान करणाऱ्याला विश्वाची प्राप्ती होते. उकाराचे ध्यान करणाऱ्याला तैजस ची प्राप्ती तर मकाराचे ध्यान करणाऱ्याला प्राज्ञ अवस्था प्राप्त होते. मात्रा विरहित म्हणजे ध्वनीरहीत कोणतीही गती असत नाही. (तुरिय अवस्था प्राप्त होते)

---

**अमात्रश्चतुर्थोऽव्यवहार्यः प्रपञ्चोपशमः । शिवो द्वैत एवमोंकार आत्मैव संविशति ।आत्मनात्मानं य एवं वेद ॥ 12॥**

अमात्र अव्यवहार्यः प्रपञ्च उपशमः शिवः अद्वैतः चतुर्थः ॐकारः एवम् यः एवम् वेद आत्मना आत्मानम् आत्मैव संविशति।

अमात्र मात्रा रहीत अमात्र पुं. प्र. ए. व.

अव्यवहार्यः देवाणघेवाण न करता येण्याजोगा अव्यवहार्य पुं. प्र. ए. व.

प्रपञ्चः जग प्रपञ्च पुं. प्र. ए. व.

उपशमः प्रस्थापित शांतता उपशम पुं. प्र. ए. व.

उप+शम् धातु शांती करणे +घञ् प्रत्यय

शिवः पुं. प्र. ए. व.

अद्वैतः पुं. प्र. ए. व.

चतुर्थः पुं. प्र. ए. व.

ॐकारः ॐकार पुं. प्र. ए. व.

एवम् नक्की एव नपुं. प्र. ए. व.

यः जो यद् पुं. प्र. ए. व.

एवम् एव नपुं. प्र. ए. व.

वेद जाणतो विद् धातु कर्तरि प्रयोगः लट् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

आत्मना आत्म्याने आत्मन् नपुं. तृ. ए. व.

आत्मानम् आत्म्याला आत्मन् नपुं. द्वि. ए. व.

आत्मैव आत्मा एव आत्मन् नपुं. प्र. ए. व.

एव नक्की अव्यय

संविशति प्रविष्ट होतो सम्+विश् धातु प्रवेश करणे कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

तुरिया अवस्थेचा अनुभव म्हणजे आत्मज्ञान, आत्मसाक्षात्कार. आपल्यातील 'स्व' ला विसरून परमात्म्याशी एकरूपता. आत्म्याच्या ह्या चौथ्या अवस्थेचे वर्णन 7 व्या मंत्रात विस्ताराने आपण वाचले आहे. एक अतिशय महान अनुभव ज्याला शिव असे संबोधले आहे. जेथे दुःखाचा लवलेशही नाही आणि केवळ सुखाचा अनुभव म्हणजे शिव, म्हणजे कल्याणमय अवस्था. आधीच्या तीन अवस्थांचा ॐकाराच्या तीन मात्रांशी असलेला परस्पर संबंध आपण वाचला आहे. आता तुरिय अवस्थेला अमात्र असे म्हटले आहे. परमश्रेष्ठ आत्म्याची ओळख आपण आत्म्याद्वारे करून घेत आहोत. श्रीमद्भगवद्गीतेच्या 12 व्या अध्यायाचे नाव भक्तीयोग असे आहे ज्यामधे भक्ताच्या अपेक्षित गुणांचे वर्णन केले आहे. जसे सहनशील, आत्मसंयमी, समभावी, ईर्ष्यारहित, मिथ्या अहंकार रहित, सर्व सजीवांप्रति मैत्री आणि समता. तुरिया अवस्था प्राप्त करण्यापूर्वीची हि पूर्वतयारी.

द्वैतापासून आत्म्याचा प्रवास अद्वैताकडे होत आहे. ॐकाराची ध्वनी रहीत अवस्था म्हणजे तुरिया अवस्था.

हे विश्वचि माझे घर। ऐसी मती जयाची स्थिर। किंबहुना चराचर। आपणचि जाहला।।' ज्ञानेश्वरी 12.213।। असे ज्ञानेश्वरांनी यथार्थ वर्णन केले आहेच.

ह्या मंत्राचा थोडक्यात अर्थ असा की

मात्रारहीत अशी चौथी अवस्था, अव्यवहार्य, प्रपंचाचा उपशम करणारी शिव आणि अद्‌वैत आहे. अशा प्रकारे आत्मा हाच ॐ आहे, हे जो जाणतो तो आत्म्याने पूर्णतया आत्म्यातच प्रवेश करतो.

---

**ओंकारं पादशो विद्यात्पादा मात्रा न संशयः ।ओंकारं पादशो ज्ञात्वा न किंचिदपि चिन्तयेत् ॥ K 24 ॥**

ओंकारं पादशो विद्यात् पादाः मात्राः न संशयः ओंकारं पादशो ज्ञात्वा न किंचित् अपि चिन्तयेत्

ओंकारम् ॐकार पुं. द्वि. ए. व.

पादशो मात्रा मात्राने

पादश पुं. प्र. ब. व.

पादं पादम् इति पादशाः

विद्यात् जाणून घ्यावे विद् धातु कर्तरि प्रयोगः आशीर्लिङ्ः लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

पादाः पाद पुं. प्र. ब. व.

मात्राः मात्रा स्त्री. प्र. ब. व.

न अव्यय

संशयः संशय पुं. प्र. ए. व.

ओंकारम् ॐकार पुं. द्वि. ए. व.

पादशो पादश पुं. प्र. ब. व.

ज्ञात्वा जाणून घेऊन ज्ञा धातु जाणणे +क्त्वा प्रत्यय

न अव्यय

किंचित् किम्+चित् काहीही

अपि सुद्धा अव्यय

चिन्तयेत् चिंतन करावे चिन्त् धातु चिंतन करणे कर्तरि प्रयोगः विधिलिङ् लकारः परस्मै पदम् प्र. पु. ए. व.

आतापर्यंतच्या मंत्रात आणि कारिकेत आपण आत्म्याच्या चार अवस्थांचे ॐकाराच्या मात्रांशी असलेले घट्ट परस्पर संबंध जाणून घेतले. ॐ काराचे अमात्र म्हणजेच आत्मा. ॐ कार हाच आत्मा आहे आणि आत्मा हाच ॐ कार आहे याचे सम्यक ज्ञान झाले म्हणजे ॐ काराचे चिंतन म्हणजेच आत्म्याचे चिंतन. आत्मा एकच पण आपल्या सोयीनुसार त्याचे आपण चार भाग केले. हे सर्व भाग सारखेच महत्वाचे. बाह्य जगताचे ज्ञान त्याचे आंतर्मनात झिरपणे आणि त्यानंतर शून्यत्वाची जाणीव गाढ निद्रावस्थेत होणे. त्याच अतीव आनंदाचा अनुभव जागेपणी मिळवण्याचा प्रयास म्हणजे स्वतः च्या आत्म्यामधे परमात्म्याचे अस्तित्व जाणून घेणे. म्हणून ह्या कारिकेत असे सांगितले आहे की

ॐकाराला पायरीपायरीने जाणून घ्यावे. त्याचे पाद (अवस्था) म्हणजेच ॐकाराच्या मात्रा. ॐकाराचे असे पायरीपायरीने ज्ञान करून घेतल्यावर इतर कशाचे ध्यान करू नये. (त्याची आवश्यकता नाही)

---

**युञ्जीत प्रणवे चेतः प्रणवो ब्रह्म निर्भयम् ।**

**प्रणवे नित्ययुक्तस्य न भयं विद्यते क्वचित् ॥ K 25॥**

चेतः प्रणवे युञ्जीत प्रणवः  निर्भयम् ब्रह्म प्रणवे नित्य युक्तस्य क्वचित् भयम् न विद्यते।

चेतः चित्त चेतस् नपुं. प्र. ए. व.

प्रणवे ॐकारात प्रणव पुं. स. ए. व.

युञ्जीत सामावून घेणे युज् धातु कर्तरि प्रयोगः विधिलिङ् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

प्रणवः ॐकार प्रणव पुं. प्र. ए. व.

निर्भयम् निर्भय नपुं. द्वि. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपुं. प्र. ए. व.

प्रणवे  प्रणव पुं. स. ए. व.

नित्य नेहमी

युक्तस्य युक्त नपुं. ष. ए. व.

क्वचित् अव्यय कसलेही

भयम् भय नपुं. द्वि. ए. व.

न अव्यय

विद्यते असते विद् धातु असणे दिवादि कर्तरि प्रयोगः लट् लकारः आत्मने पदम् प्र. पु. ए. व.

अध्यात्माचा अभ्यास सुरू केला असता, त्याचा काय फायदा होतो असा प्रश्न अनेकांना पडतो. आत्मज्ञान प्राप्त करण्याचा मार्ग बराच मोठा आणि खडतर सुद्धा आहे. त्यामध्ये सातत्य हवे. तरीसुद्धा काहीनाकाही चांगले परिणाम दिसून येतातच. जसे सहनशीलता वाढीस लागते क्षमाशीलता वाढते. सकारात्मक दृष्टिकोण, आंतरिक शांति, आत्म-नियंत्रण आणि

आत्म-साक्षात्कार वगैरे. ह्या कारिकेत प्रथमच प्रणव हा शब्द वापरला आहे.  पवित्र ध्वनी “ॐ” म्हणजेच प्रणव जे परमात्म्याचे प्रतीक मानले जाते.

ह्या कारिकेत असे म्हटले आहे की

ॐकाराच्या शब्दोच्चाराने मन भारून जाऊदे. ॐकार हा निर्भय असे ब्रह्मच आहे. जो नेहमी प्रणव युक्त (ॐकाराचे सतत चिंतन) असतो तो नेहमी भयमुक्त असतो.

---

**प्रणवो ह्यपरं ब्रह्म प्रणवश्च परः स्मृतः ॥अपूर्वोऽनन्तरो ऽ बाह्योऽनपरः प्रणवोऽव्ययः ॥ K 26॥**

प्रणवः हि अपरम् ब्रह्म प्रणवः च परः स्मृतः प्रणवः अपूर्वः अनन्तरः अबाह्यः अनपरः अव्ययः।

प्रणवः प्रणव पुं. प्र. ए. व.

हि नक्कीच अव्यय

अपरम् अपर नपुं. प्र. ए. व.

ब्रह्म ब्रह्मन् नपुं. प्र. ए. व.

प्रणवः प्रणव पुं. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

परः पर पुं. प्र. ए. व.

स्मृतः स्मृ धातु क्त प्रत्यय पुं. प्र. ए. व.

प्रणवः प्रणव पुं. प्र. ए. व.

अपूर्वः अपूर्व पुं. प्र. ए. व.

अनन्तरः अनन्तर पुं. प्र. ए. व.

अबाह्यः अबाह्य पुं. प्र. ए. व.

अनपरः अनपर पुं. प्र. ए. व.

अव्ययः अव्यय पुं. प्र. ए. व.

परब्रम्हाचे सगुण साकार रूप आणि निर्गुण निराकार रूप असे भेद आपल्याला माहीत आहेत. तसेच अपरा म्हणजे निम्न विद्या आणि परा विद्या असे स्पष्ट उल्लेख मुण्डकोपनिषदात वाचायला मिळतात. विश्वानर आणि तैजस हे कार्यकारणबद्ध आहेत तर प्राज्ञ केवळ कारणभावाने सिद्ध आहेत. मात्र तुरिया अवस्थेचे कार्य आणि कारण दोन्ही भाव नसतात असे आपण 11 व्या कारिकेत वाचले आहे. ह्या कारिकेत अपर आणि अनपर ब्रह्म असा उल्लेख केला आहे.जे साधक अजून बाल्यावस्थेत आहेत त्यांनी ॐकाराचे पठण करावे. मात्र अमात्रा म्हणजे तुरिया अवस्था. ज्यांना आत्मज्ञान प्राप्त झाले आहे त्यांना द्वितीय ओळ लागू पडते.

प्रणव म्हणजे ॐकार आत्मा आणि परमात्मा दोन्हीचे प्रतिनिधीत्व करते अशी मध्यवर्ती कल्पना असून ह्या कारिकेत ब्रह्माची निरनिराळी वैशिष्ट्ये सांगितली आहेत.

अपूर्व म्हणजे पूर्वी न पाहिलेले तसेच अनन्तर म्हणजे सर्वव्यापी, एकजिनसी आणि स्वतः व्यतिरिक्त दुसरे काहीच नाही असे.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

प्रणव हे निम्न ब्रह्म आहे तसेच ते परम ब्रह्म सुद्धा आहे. ते पूर्व दृष्टान्त रहीत, त्याच्याशिवाय काहीच नाही अनन्तर, त्याच्या बाहेर काहीच नाही असे अबाह्य, अभिव्यक्ती रहीत असे अनपर आणि शाश्वत म्हणजे अव्यय असे आहे.

---

**सर्वस्य प्रणवो ह्यादिर्मध्यमन्तस्तथैव च ॥**

**एवं हि प्रणवं ज्ञात्वा व्यश्नुते तदनन्तरम् ॥ K 27॥**

प्रणवः सर्वस्य आदिः मध्मम तथा एव च अन्तः ही

प्रणवम् एवम् हि ज्ञात्वा तत् अनन्तरम् व्यश्नुते

प्रणवः प्रणव पुं. प्र. ए. व.

सर्वस्य सर्व पुं. ष. ए. व.

आदिः आदि पुं. प्र. ए. व.

मध्मम् मध्य नपुं. द्वि. ए. व.

तथा अव्यय

एव नक्की अव्यय

च सुद्धा अव्यय

अन्तः अन्त पुं. प्र. ए. व.

ही नक्कीच अव्यय

प्रणवम् प्रणव पुं. द्वि. ए. व.

एवम् एव नपुं. द्वि. ए. व.

हि नक्कीच अव्यय

ज्ञात्वा जाणून ज्ञा धातु जाणणे क्त्वा प्रत्यय

तत् तद् नपुं. द्वि. ए. व.

अनन्तरम् अनन्तर नपुं. द्वि. ए. व.

व्यश्नुते वि+अश् धातु पसरणे कर्तरि लट् लकार आत्मनेपद प्र. पु. ए. व.

आधीच्या कारिकेत प्रणव ॐकार आत्मा आणि परमात्मा दोन्हीचे प्रतिनिधीत्व करतो असे म्हटले होते. म्हणूनच प्रणव ॐकाराला आदि मध्य आणि अंत असे म्हटले आहे. प्रणव सम्पूर्ण ब्रह्माण्डाचा रचयिता, पालक आणि संहारक सुद्धा आहे.

ह्या कारिकेत असे म्हटले आहे की

ॐ सर्वांचाच आदि, मध्य आणि अंत आहे. हे असे ॐकाराचे स्वरूप जाणणारा निःसंशयपणे परमतत्त्वाला प्राप्त होतो.

---

**प्रणवं हीश्वरं विद्यात्सर्वस्य हृदि संस्थितम् ।**

**सर्वव्यापिनमोंकारं मत्वा धीरो न शोचति ॥ K 28॥**

प्रणवम् ही सर्वस्य हृदि संस्थितम् ईश्वरम् विद्यात् ॐकारम् सर्वव्यापिनम् मत्वा धीराः न शोचति

प्रणवम् प्रणव पुं. द्वि. ए. व.

ही नक्कीच अव्यय

सर्वस्य सर्वांचा सर्व पुं. ष. ब. व.

हृदि हृदय नपुं. स. ए. व.

संस्थितम् स्थित असलेला सम्+स्थित नपुं. द्वि. ए. व.

ईश्वरम् ईश्वर पुं. द्वि. ए. व.

विद्यात् जाणून घ्यावे विद् धातु कर्तरि आशीर्लिङः लकारः परस्मैपदी प्र. पु. ए. व.

ॐकारम् ॐकार पुं. द्वि. ए. व.

सर्वव्यापिनम् सर्वव्यापी सर्वव्यापिन् पुं. द्वि. ए. व.

मत्वा बोध घेऊन मन् धातु+क्त्वा प्रत्यय

धीराः विवेकी माणसे धीर पुं. प्र. ब. व.

न अव्यय

शोचति शुच् धातु कर्तरि लट् लकार परस्मैपद प्र. पु. ए. व.

ॐकाराची व्याप्ती कशी कशी आहे ते जाणून घेण्याचे परीणाम काय आहेत हे सांगणे हिच ह्या आगम प्रकरणाची मध्यवर्ती कल्पना आहे. त्या अनुषंगाने ध्यानधारणा करण्याने आपल्यामध्ये काय बदल होऊ शकतो ते सुद्धा सांगितले आहे. ह्याबद्दल थोडी चर्चा आपण 25 व्या कारिकेत केली आहेच. ह्या कारिकेत ॐकाराला ईश्वर असे म्हटले आहे. ईश्वराची सर्वमान्य वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे सृष्टिकर्ता, सर्वशक्तिमान, सर्वज्ञ, सर्वव्यापी, न्यायकर्ता आणि शाश्वत.

ह्यापैकी बरीचशी वैशिष्ट्ये आपण आधीच्या मंत्रात आणि कारिकेत वाचली आहेत.

ह्या कारिकेचा थोडक्यात अर्थ असा की

ॐ कारच ईश्वर आहे असे समजावे. तो सर्वांच्या हृदयात वसलेला आहे. सर्वांना व्यापून राहिलेला असा तो. असे ज्ञान झालेला विवेकी मनुष्य शोकशून्य होतो.

---

**अमात्रोऽनन्तमात्रश्च द्वैतस्योपशमः शिवः ।**

**ओंकारो विदितो येन स मुनिर्नेतरो जनः ॥ K 29॥**

अमात्रः अनन्तमात्रः च द्वैतस्य उपशमः शिवः ओंकारः येन विदितः सः मुनिः न इतरः जनः

अमात्रः ध्वनी विरहित अमात्र पुं. प्र. ए. व.

अनन्तमात्रः अमर्याद अनन्तमात्र पुं. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

द्वैतस्य द्वैत नपुं. ष. ए. व.

उपशमः स्थिरता उपशम पुं. प्र. ए. व.

शिवः कल्याणकारी शिव पुं. प्र. ए. व.

ओंकारः ओंकार पुं. प्र. ए. व.

येन ज्याने यद् पुं. तृ. ए. व.

विदितः जाणले विदित पुं. प्र. ए. व. विद् धातु +क्त प्रत्यय

सः तो तद् पुं. प्र. ए. व.

मुनिः मुनि पुं. प्र. ए. व.

न अव्यय

इतरः इतर पुं. प्र. ए. व.

जनः लोक जन पुं. प्र. ए. व.

अध्यात्मिक साधनेच्या मार्गावरील मुनी हे प्रथम श्रेणीतील साधक असे म्हणता येईल. मन् या धातुपासून निर्माण झालेला शब्द ज्याचा अर्थ “चिंतन करणारा.” मुनी म्हणजे जो सतत आत्मचिंतनात मग्न असतो, ज्याने मनावर नियंत्रण मिळवले आहे असा. स्थितप्रज्ञाची लक्षणे सांगताना भगवंतांनी मुनी असा शब्द वापरला आहे.

दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः । वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते
॥श्रीमद्भगवद्गीता 2.56 ॥

दुःखदायक प्रसंगी ज्याच्या मनाला खेद वाटत नाही, सुखांच्या प्राप्तीविषयी ज्याला मुळीच इच्छा नाही, तसेच ज्याचे प्रीती, भय व क्रोध नाहीसे झाले आहेत, असा मुनी स्थिरबुद्धी म्हटला जातो. बुद्धि स्थिर होणे म्हणजेच मनात भावभावनांचे कल्लोळ निर्माण न होऊ देणे, असे श्रीमद्भगवद्गीतेच्या 2र्या अध्यायातील 14 व्या श्लोकात सांगितले आहेच. ज्याने ॐकाराचे पूर्ण स्वरूप जाणून घेतले आहे त्याच्या मनोवृत्तीत बदल घडत आहेत असे आपण आधीच्या कारिकेत वाचले. तो आत्ममग्न असा मुनी, आता त्याच्या मनातील द्वैत भाव सुद्धा संपुष्टात येत आहे.

ह्या कारिकेत असे म्हटले आहे की

ध्वनीरहीत आणि अनंत, द्वैताच्या अभावी अतिशय शांत आहे असा, हे सर्व ज्याला साधले तोच मुनी, इतर जण नाहीत.

---

येथे माण्डुक्योपनिषदाचे सर्व 12 मंत्र आणि श्री गौडपादाचार्यांच्या आगम प्रकरण व त्यामधील 29 कारिकांचे मराठी भाषांतर पूर्ण झाले.

-------------------------------------------🙏🙏🙏🙏--------------------------------------------------------

**Iti Anagha**